वैद्य ब्रदर्स यांची सनातनधर्म-लेखमाला. लेख ७ वा.



# आश्रम

आणि

# आश्रमधर्म.

लेखक

गजानन भास्कर वैद्य.
बी. ए. एफ. टी. एस.

प्रकाशक

वैद्य ब्रदर्स.
काळबादेवी पोस्ट.
मुंबई.



१९०६.

वैद्य ब्रदर्स यांची सनातनधर्म-लेखमाला.

लेख ७ वा.



# आश्रम आणि आश्रमधर्म.

लेखक
गजानन भास्कर वैद्य
बी.ए.एफ.टी.एस.

प्रकाशक
वैद्य ब्रदर्स
काळबादेवी पोस्ट; मुंबई.

१९०६.

किंमत सात आणे.



## प्रकाशकांची सूचना.

सनातनधर्म किंवा हिंदुधर्म यांत येणारे कांहीं विषय साधारण जिज्ञासु स्त्री-पुरुषांस विशद व्हावे अशा धोरणानें सोप्या भाषेंत लिहिलेले लेख प्रसिद्ध करावे असा आमचा विचार आहे. हे लेख लिहिण्याचें काम रा. रा. गजानन भास्कर वैद्य यांजकडे दिलें आहे. त्यांनीं तूर्त सात लेखांची योजना केली असून ते साधारणतः अशा विषयांवर येतील–( १ ) एक देव आणि अनेक देव, ( २ ) आत्मा आणि त्याची गति, ( ३ ) भूलोक आणि परलोक, ( ४ ) कर्म आणि पुनर्जन्म, ( ५ ) यज्ञ आणि पंचयज्ञ, ( ६ ) उपासना आणि योग-मार्ग, ( ७ ) आश्रम आणि आश्रमधर्म. यांतला सातवा लेख आधीं लिहिला म्हणून तो आम्ही पहिल्यानें छापून प्रसिद्ध करीत आहों.

प्रस्तुत लेखकांना लिहिण्यापेक्षां बोलण्याची सवय जास्त असल्यामुळें त्यांनीं लेखांना व्याख्यानांचें रूप देण्याचा विचार केला आहे, व या रूपानें हातीं घेतलेले विषय जास्त सोप्या भाषेंत लिहितां येतील असें त्यांना वाटत आहे.

त्यांनींच एक **'विष्णूचे अवतार'** असा नवीन ग्रंथ लिहिला आहे. तो मोठा असल्यामुळें या लेखमालेंत सामील न करतां तो आम्ही निराळा छापीत आहों. त्यांतील विषय ह्या पुस्तकाच्या शेवटीं कवराच्या तिसऱ्या पानावर दिला आहे तो पहावा अशी सर्वांस विनंति आहे.

**वैद्य ब्रदर्स.**





## विषयविभाग.







वैद्य ब्रदर्स यांची सनातनधर्म–लेखमाला.

# ७–आश्रम आणि आश्रमधर्म.

( एक कल्पित व्याख्यान. ७-४-०६. )

**मुलांनो आणि मुलींनो,**—धर्मालयांत बसून आपण आज सात दिवस सनातनधर्माचा अभ्यास करीत आहों. पहिल्या सप्ताहाची आज समाप्ति आहे. **'आश्रम आणि आश्रमधर्म'** ह्या विषयाचें मी आतां विवेचन करणार आहें तें सावधान चित्तानें ऐकावें अशी विनंति आहे.

## १. धर्मविवेचनाची परिभाषा.

शाळेंत आपण विद्या शिकत असतों तेव्हां आपले गुरुजी गणित, व्याकरण, भूगोल असा विषय शिकवीत असले म्हणजे त्या विषयांतले शब्द ठरलेल्या अर्थानें योजीत असतात. अशा शब्दांना त्या विषयाची **परिभाषा** म्हणतात. अव्यय, विशेषण, नाम, हे शब्द भूगोलाच्या वेळीं येत नाहींत; व्याकरण शिकतांनाच यावयाचे. इतकेंच नव्हे तर त्यांचे अर्थ किंवा त्यांच्या व्याख्या ठरलेल्या आहेत, व त्या माहीत असल्या म्हणजे तो विषय शिकतांना फार सोपें जातें. तीच गोष्ट धर्मविषयाला लागू आहे. त्याचीही परिभाषा आहे व ती समजलेली असली म्हणजे कोणत्याही धर्मविवेचनाच्या वेळीं तें समजण्यास अड-चण पडत नाहीं. म्हणून आजच्या विवेचनांत येणारे कांहीं शब्द मी येथेंच सांगून ठेवतों.

विश्वाचें बहिरंग व अंतरंग अशा दृष्टीनें पहातां वस्तु दोन. एक **जग** व दुसरी वस्तु **देव.** जगाला (आणि त्याप्रमाणें विवाहापासून विस्तार वाढतो म्हणून विवाहित स्थितीला) प्रपंच किंवा **संसार** म्हणतात; आणि देवाला परमेश्वर किंवा **परमात्मा** म्हणतात. ज्याला मनुष्य म्हणतात त्यांत **देह** आणि **जीव** असे दोन भाग आहेत. जीव किंवा आत्मा हा मूळारंभीं देवाजवळ होता तेव्हां त्याचा देवाशीं **योग** होता. तो देवाला सोडून निघाला तेव्हां त्याचा देवापासून **वियोग** झाला. वियोग जाऊन योग होणें यालाच **आत्मोन्नति** म्हणतात. हें ज्या नियमांनीं होतें तो **धर्म.** तर प्रत्येक जीवाचा जो आत्मोन्नतीचा नियम तो त्याचा धर्म किंवा **स्वधर्म.**

देवापासून दूर जाणें ह्याला **प्रवृत्ति** म्हणतात; व देवाकडे येण्यास परत फिरणें ती **निवृत्ति.** ह्या वर्तुलाकडे पहा. अर्धवर्तुलमार्ग ती प्रवृत्ति व दुसरी अर्धी वाट ती निवृत्ति. हा द्विरूपी संपूर्ण वर्तुलमार्ग प्रत्येक जीवाला चालावयाचा आहे. म्हणजे प्रवृत्तिमार्ग हा जर मार्ग, तर निवृत्तिमार्ग हाही मार्गच होय. मार्ग जो आहे तो चालून गेल्याशिवाय संपणार नाहीं. तर निवृत्तिमार्गांत देखील प्रयत्न किंवा गति चालूच आहे. सकाळीं शाळेंत येतांना चालावें लागतें तितकेंच सायंकाळीं घरीं जातांनाही चाललें पाहिजे. जितके मैल लांब प्रवृत्ति तितकेच मैल लांब निवृत्ति. हा विचार जर नीट मनांत आणाल तर निवृत्ति म्हणजे आळस असें तुम्ही कधींही म्हणणार नाहीं. प्र-वृत्ति आणि नि-वृत्ति ह्या दोन मार्गांत मनुष्याची मनो-वृत्ति किंवा त्याचा आत्मानुभव भिन्न असतो इतकेंच. व दोन मार्गांत कांहीं भेद असलाच तर तो हा कीं, प्रवृत्तिमार्गांत जीवाची देवाकडे पाठ असून निवृत्तिमार्गांत त्याचें तोंड देवाकडे आहे. एकांत तो विमुख दिसतो, दुसऱ्यांत संमुख दिसतो.



जीव दिसत नाहीं, तरी त्याला तीन गुणांवरून ओळखतात. साखरेला वजन आहे, तिला गोडी आहे, तिला रंग आहे. हे तीन गुण एकाच वस्तूच्या अंगीं आहेत. तसेच जीवाच्या अंगीं तीन गुण आहेत. ते ज्ञान, इच्छा, व क्रिया हे होत. क्रियावंत जीव तो स्वकर्म करणारा **कर्ता,** इच्छावान जीव तो इष्टवस्तु साध्य करूं पहाणारा **भक्त,** आणि ज्ञानवान जीव तो

आत्मानुभवी **ज्ञानी**. अशा तीन गुणांचा अंगीं उदय करीत करीत तो मार्गस्थ जीव वियोगापासून योगाकडे चालला आहे. वाटेंत प्रवास सोपा जावा म्हणून कृपाळू ऋषींनीं वाटेचे नकाशे काढून ठेवले आहेत, व **पथिकाश्रम** कोठें आहेत, चोरांची वसति कोठें आहे, मार्गदर्शक सद्गुरु कोठें रहातात, वगैरे अनुभवसिद्ध माहिती लिहून ठेवली असून एकंदर प्रवासाचे नियम सांगितले आहेत. हे जे आत्मगतीचे नियम तो धर्म होय; व अशाच नियमांतले **'आश्रम आणि आश्रमधर्म'** हे अत्यंत महत्त्वाचे नियम होत. ते प्रत्येक मनुष्यानें पाळावे, कारण तो त्याच्या आत्महिताचा मार्ग आहे.

वियोगापासून योगापर्यंतची आत्मोन्नति होण्यास मनुष्याला अनेक जन्म घ्यावे लागतात. **एका जन्मांतील आयुष्याचे चार भाग** करून त्या त्या भागांतील योग्य कामें किंवा आचरणाचे नियम सांगितले आहेत. ह्या चार भागांना धर्मविवेचनाच्या परिभाषेंत **आश्रम** म्हणतात व त्यांतील कर्तव्यकर्मांना किंवा आचरणाच्या नियमांना **आश्रमधर्म** म्हणतात.

## २. प्रस्तुत विषयाचा अर्थ.

मुलांनो, इतका वेळ मी बोललों तें समजण्यास थोडें कठीण आहे खरें, तरी तें विचार करून समजून घ्या म्हणजे पुढचा विषय तुम्हांला सोपा जाईल व तो बोधप्रद वाटेल.

आश्रम, धर्म, आश्रमधर्म, आणि त्याचप्रमाणें **आश्रमव्यवस्था** हे चार शब्द येथें महत्त्वाचे आहेत. पहा, मुलांनो, ऋषींची शब्दयोजना किती समर्पक ती. एखादी वस्तु अशी महत्त्वाची असते कीं ती पाहिली असतां किती तरी गोष्टींचें स्मरण होतें. तसेच कांहीं शब्द असतात. **आश्रम!** काय त्या शब्दाचें सामर्थ्य सांगावें! आश्रम म्हणजे घर, रहाण्याची जागा. होय, पण कोणाची? संतांची, गुरूची, ऋषींची, सज्जनांची. **धर्मात्मे सज्जन रहातात तो आश्रम.** हा विचार जागृत रहावा म्हणून आयुष्यांच्या विभागांना तें नांव दिलें, —अशासाठीं कीं प्रत्येक माणसाला आपल्यावरील जबाबदारीची आठवण रहावी. आपण जन्मभर पवित्र राहून चार आश्रम असे पाळूं कीं त्यांच्या त्या आश्रमपणाला कमीपणा येणार नाहीं, —ही आठवण तो शब्द करून देतो.

तर चार आश्रम म्हणजे चार जागा किंवा शाळेंतले जणू **चार वर्ग.** एका वर्गांत शिकून तुम्ही वरच्या वर्गांत जातां तसें मनुष्यानें क्रमाक्रमानें चार आश्रमांतून गेलें पाहिजे.

ह्या चार आश्रमांत असतां जें कांहीं केलें पाहिजे त्याला त्या आश्रमांचा धर्म म्हणतात. आणि येथें धर्म शब्द तरी आश्रम शब्दासारखाच महत्त्वाचा आहे. धर्म म्हणतांच आयुष्यभर करावयाच्या त्या सर्व कामाला पवित्रता आली. धर्म ही जशी एक मोठी शक्ति आहे, तशीच ती एक प्राणांसारखी प्रिय वस्तु आहे. एखादा मनुष्य दुराचरण करीत असला तर 'अरे हें बरें नव्हे' असें सांगून तो ऐकत नाहीं, पण तेंच 'अरे हा धर्म नव्हे' असें म्हणा म्हणजे त्याच्या मनाला एक प्रकारचा सावधपणा येतो. आर्यलोकांची नीति अशी असे कीं युद्धप्रसंगीं देखील ते धर्माचरण करीत व दुराचरण करणाराला 'अरे हें धर्मयुद्ध नव्हे' असें म्हणून सावध करीत असत. इतकी त्या शब्दांत जादू आहे. म्हणून तेंच नांव आश्रमाचरणाच्या नियमांना दिलें आहे.

असे आश्रमधर्म यथाक्रम लावून दिले आहेत म्हणून ती आश्रमव्यवस्था होय. कोणत्याही कामाची 'व्यवस्था' लावण्यास बराच अनुभव व ज्ञान ह्यांची गरज आहे. तसे ते ऋषि ज्ञानी व अनुभवी असले पाहिजेत म्हणून त्यांना आत्मोन्नतीच्या मार्गाची नीट व्यवस्था लावतां आली. आपले शाळेंतील गुरु अनुभवी असल्यामुळें जसे वर्गांची व्यवस्था लावतात, किंवा **वेळापत्रक** करून अभ्यासाची व्यवस्था लावतात, तसाच हा आश्रमव्यवस्थेचा प्रकार होय. ह्या आश्रम नामक वेळापत्रकाप्रमाणें वागूं तर आपलें आयुष्य फुकट जाणार नाहीं असा सहजच ह्यावरून बोध घेतां येतो. अक्षर वळवतांना आपण **कित्ता** पुढें ठेवतों तसे चार आश्रमांचे **आदर्शविचार** ध्यानांत धरून वागूं तर आत्मोन्नतीचें बरेंचसें काम एका जन्मांत होईल.

## ३. आश्रमांचीं जुनीं नांवें.

कोणी पांथस्थ प्रवासांत असला म्हणजे तो ज्या आश्रमांत उतरण्यास जातो त्याला पथिकाश्रम म्हणतात. धर्मांतील आश्रम हेही पथिकाश्रमच आहेत. तेथें **जीवप्रवासी** वसति करून विसांवा व अनुभव घेतो. 'सनातनधर्मसंवादांत' ह्याविषयीं असें म्हटलें आहे. '**प्रश्न ४९ वा** – चार आश्रम हे काय आहेत?

**उत्तर**—चार आश्रम ह्या मनुष्याच्या एका जन्मांतील चार अवस्था होत. त्या ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, व संन्यासी अशा आहेत.'

चार अवस्थांचीं हीं प्राचीन नांवें त्या त्या स्थितीचें स्वरूप चांगलें दाखवितात. **ब्रह्म म्हणजे वेद,** विद्या, ज्ञान, आणि चारी म्हणजे आचरण करणारा. ब्रह्मचारी म्हणजे विद्या शिकणारा किंवा ज्ञानार्जन करणारा. यावरून पहिल्या आश्रमाचें काम असें दिसतें कीं अनेक प्रकारची उपयुक्त विद्या शिकून ज्ञानाचा संग्रह करावा आणि चांगला **संस्कार** करून घ्यावा. विद्या पुरी होईपर्यंत विवाह करीत नसत म्हणून पुढें ब्रह्मचारी शब्दाचा अविवाहित असा अर्थ झाला. पण पहिला व खरा अर्थ महत्त्वाचा असून लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

गृहस्थ म्हणजे घरांत संसारी होऊन रहाणारा. ब्रह्मचारी हा गुरूच्या आश्रमांत राही, व तसेंच तिसरा व चौथा हेही आश्रम घरांत रहाण्याचे नव्हते. दुसऱ्या आश्रमांतील माणसें गुरूचा आश्रम सोडून, व इतरत्र संचार न करतां, घरांत राहणारीं म्हणून तीं गृह-स्थ होत. पहिल्या आश्रमांतील संस्काराप्रमाणें, दुसऱ्या आश्रमांत जीवाचा अनुभवार्थ प्रयत्न चाललेला असतो. वानप्रस्थ म्हणजे वनांत जाऊन रहाण्यास सिद्ध झालेला. ह्या आश्रमांत जीवाला असा निश्चय करावयाचा असतो कीं मी स्वार्थ किंवा अज्ञान सोडून आत्मोन्नत होईन. **संन्यासी** म्हणजे सम् किंवा सम्यक् रीतीनें—पूर्णपणें—न्यास करणारा; अज्ञान, मोह, माया, असत् जें आहे तें चांगल्या रीतीनें किंवा **सर्वस्वीं ज्याचें सुटलें** असा आत्मानुभवी जो तो संन्यासी.

चार आश्रमांचीं नांवें कशीं अर्थपूर्ण आहेत तीं पहा. ऋषींनीं एकेका नांवांत मार्ग दाखवून दिला आहे. तर चार आश्रमांतील मनुष्यांचे गुण संस्कार, प्रयत्न, निश्चय, अनुभव, असे दिसतात ते नीट ध्यानांत ठेवा. मुलांनो, **आश्रम चारच कां?** तीन किंवा पांच कां केले नाहींत? तर त्याचें कारण असें आहे कीं मनुष्यांतील **चार** तत्त्वांशीं त्यांचें सादृश्य आहे. मनुष्य एके प्रकारें आत्मा-बुद्धि-मन-देह असा असलेला गीतादि ग्रंथांत सांगितला आहे. ह्या चार अवस्थांशीं आपल्या चार आश्रमांचें अगदीं जवळचें नातें आहे. जगाचें ज्ञान इंद्रियांच्या द्वारें होऊन आंत संस्कार होतात; त्या संस्का-

न्यावयाची आणि अभेदभावाचा उदय करावयाचा. येथें योग शब्द आरंभीं परिभाषेंत सांगितला त्याच अर्थानें घ्यावयाचा.

आतां हीं नवीं नांवें अर्थासह ध्यानांत ठेवा म्हणजे पुढच्या विवेचनांत तीं जेथें जेथें येतील तेथें तेथें सहज समजतील.

## ८. विद्याश्रमाचे धर्म.

विद्या ही सर्व काळीं व सर्व ठिकाणीं पवित्र मानली आहे. जेथें विद्येचा अपमान होतो तेथें समाजाचें व देशाचें कल्याण होत नाहीं. भर्तृहरीनें विद्येला गुरूंचा गुरु व परा देवता म्हटलें आहे. ज्याला विद्या नाहीं तो पशूसारखा होय. अशी विद्या ही महत्त्वाची, म्हणून विद्याश्रम देखील महत्त्वाचा आहे. आयुष्याचे कांहीं दिवस केवळ विद्याच शिकण्याचे आहेत. त्या वेळीं दुसरीं कामें अंगावर घेतलीं तर विद्येकडे दुर्लक्ष होईल. आयुष्याचे विभाग सांगून ऋषींनीं कामांची वांटणी केली आहे, त्यांत विद्याश्रमांत आपलें काम आळस न करतां ज्ञान मिळविण्याचें आहे. तुम्ही ज्या वर्गांत असतां त्याचेच धडे करतां, खालच्या किंवा वरच्या वर्गाचे करीत नाहींत, असाच हा प्रकार आहे. पुढच्या तीन आश्रमांत आपल्याला काय करावें लागेल व एकंदर व्यवहारांत कोणतें लौकिक ज्ञान उपयोगी पडेल हें सर्व विद्याश्रमांत शिकावयाचें.

विद्या कोणती शिकावयाची ह्याचें विस्तृत विवेचन करण्याचा हा विषय नव्हे. विद्येची सोय वडील माणसें करीत असतात. निरनिराळ्या देशांत शिक्षणाच्या कल्पना भिन्न भिन्न आहेत. पोहण्याची कला, युद्धकला, वगैरे शाळेंत शिकविणारेही देश आहेत. आर्यलोकांत वेदांतील धर्म शिकवून शिवाय मुलाचा वर्ण किंवा अंगचे गुण पाहून पुष्कळ व्यावहारिक ज्ञान शिकवीत. त्यांत आत्महित, लोकहित व देशहित इकडे लक्ष असे. आजच्या मनूंत धर्म, नीति व व्यवहार ह्यांचें शिक्षण सर्वांस मिळावें इतकेंच प्रस्तुत प्रसंगीं सांगतां येईल.

विद्येला आरंभ उपनयनापासून होतो. बाळपणीं साधारणतः सात वर्षांचें वय होईपर्यंत शरीर कोंवळें असतें तेव्हां मुलांचा खेळण्यांत व उड्या मारण्यांत वेळ जातो. उपनयनाचा विधि झाला म्हणजे मुलांनीं असें समजलें पाहिजे कीं आतां आपल्यावर कांहीं जबाबदारी आली. कांहीं धर्मनियमांनीं आपण

रांवरून मन संकल्पविकल्प करून अनुभवार्थ एकसारखें प्रयत्न करून धडपडत असतें; बुद्धि ही निश्चयात्मिका असून ती अज्ञान सोडण्याचा माणसाकडून निश्चय करविते; आणि आत्मा हा आपल्याच ठायीं स्वतःची ओळख करून घेऊन स्वानुभव घेत असतो. ह्या चार कार्यांचें आश्रमांतील संस्कार, प्रयत्न, निश्चय, आत्मानुभव ह्या चार गुणांशीं कसें सादृश्य आहे तें पहा. म्हणून वर्ण चार तसे आश्रमही चारच सांगितले गेले व तशी व्यवस्था लावण्यांत आली.

अनेक कारणांमुळें ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, व संन्यासी हीं जुनीं नांवें आतां निर्जीव होऊन पडलीं आहेत. तीं उच्चारतांच आपल्यांतील पुरा अर्थ श्रोत्यांच्या मनांवर बिंबवीत नाहींत. जुनी शक्ति त्यांच्यांत पुन्हा कधीं येईल ती येवो. तूर्त मी ज्या धोरणानें आजच्या मनूंत चार आश्रम पाळावे म्हणून विवेचन करणार आहें त्या धोरणाला योग्य अशीं नवीं चार साधीं नांवें सांगतों, व पुढचें विवेचनही मी ह्याच नव्या नांवांनीं करणार आहें.

## ४. आश्रमांचीं नवीं नांवें.

मनुष्य विचारी असला म्हणजे त्याला आपलें जन्मास येऊन काम काय म्हणून विचार सुचतो. आपण कोणाकोणाचे ऋणी आहों व ऋण फेडून अनृणी कसें होतां येईल याचा तो शोध करितो. जन्मास येऊन आत्महितपर जें जें काम केलें पाहिजे किंवा होण्यासारखें आहे तें आश्रमधर्मांच्या रूपानें ज्ञात्या ऋषींनीं सांगून ठेवलें आहे. त्या कर्तव्यांचा समावेश आजच्या मनूंत ज्यांत होईल अशा अर्थाचीं मला नवीन नांवें सुचवावयाचीं आहेत तीं अशीं.

**पहिला विद्याश्रम.** आत्मोन्नतीचा हेतु मनांत ठेवून विद्यार्थी आणि विद्यार्थिनी ह्यांनीं हे दिवस फक्त विद्यार्जनांत घालवावयाचे. **दुसरा गृहाश्रम.** ह्यांत गृही आणि गृहिणी होऊन स्त्रीपुरुषांनीं विशेषतः स्वतःच्या व कुटुंबांतील आप्तजनांच्या आत्महितासाठीं संसारकृत्यें मनोभावानें करावयाचीं. **तिसरा सेवाश्रम.** यांत स्त्रीपुरुषांनीं देवाचे आणि बंधुभगिनींचे आपण **सेवक** आहों अशी भावना ठेवून विशेषतः धर्मसेवा आणि लोकसेवा करावयाची. **चौथा योगाश्रम.** यांत मनुष्यांनीं योगी आणि योगिनी होण्याचे आदर्शविचार जागृत ठेवून आत्मानुभवाचा प्रयत्न करीत असतां पराकाष्ठेनें शक्य तितकी भेदबुद्धि विलयास

बांधले गेलों असा भाव मनांत यावा म्हणून तर विधि करावयाचा, व मूकभाव पतकरून 'देह वाचा मन हीं तीन पवित्र राखा' असा निरंतर बोध करणाऱ्या तीन पदरी यज्ञोपवीताचा मान राखावयाचा. उप–जवळ, नयन–नेणें, यानें ज्ञानदात्या गुरूजवळ आतां आपण आलों आहों असा उघडच विचार मनांत येतो. गुरूपासून नम्रपणें ज्ञान शिकण्याखेरीज आपल्याला आतां काम नाहीं. आपले वडील कष्ट करून पैसे मिळवतात आणि आपल्या विद्येसाठीं खर्च करतात, तर आपण विद्या शिकण्यास आळस करावा काय? याचा विचार करा.

मनुष्य हा केवळ शरीर नसून देह, मन, बुद्धि, आत्मा असा चतुरंग आहे म्हणून ह्या चारही अंगांवर चांगला संस्कार होईल असें शिक्षण विद्याश्रमांत मिळावें. पुढच्या आश्रमांतील जड ओझें पेलतां यावें म्हणून शरीरबळ, मनोबळ, बुद्धिबळ व आत्मबळ, ह्यांची बरीचशी वाढ विद्याश्रमांतच झाली पाहिजे. पहांटेस उठून स्नान करणें, देवाला नमन करणें, खाणेंपिणें बेताचें राखणें, व्यायाम करणें, हे नियम पाळण्यांत आपलें हित आहे. शरिराला सुदृढ करण्याचें काम विद्याश्रमांतच साधेल.

पूर्वी गुरूच्या घरीं राहून विद्या शिकावी लागे. आतां घरांतच चांगलें वळण लागेल इकडे वडिलांनीं लक्ष दिलें पाहिजे. **'सत्यं ब्रूयात्'**– खरें बोला –असें मनूचें तुम्हांला सांगणें आहे. तें पाळा. यानें मन चांगलें होईल. सर्व कामें वेळच्या वेळीं करावीं म्हणजे आळस जाऊन शरीर आपल्या स्वाधीन राहील. खेळ खेळतांना हरलों किंवा जिंकलों तरी बेसुमार वर्तन करूं नये. अशा प्रसंगीं जी मनाला धीराची संवय लागते ती मोठेपणीं फार उपयोगीं पडेल. गुरु व वडील यांची आज्ञा पाळली असतां त्यांचा अनुभव अपल्या उपयोगीं पडतो. आपण लहानपणीं जर आज्ञा पाळूं तर मोठेपणीं दुसऱ्याला आज्ञा करतांना अविचारानें वागणार नाहीं.

विद्याश्रमांत चांगल्या गुरूंनीं व चांगल्या वडिलांनीं मुलांना अनेक अंगांनीं सुशिक्षण दिलें तर तीं धर्मवान, नीतिमान, बुद्धिवान व सामर्थ्यवान होतील. ज्यांचें शरीर सुदृढ व निरोगी नाहीं, ज्यांची जीभ स्वाधीन नाहीं, ज्यांचें मन त्यांना इकडेतिकडे नाचवीत आहे, ज्यांची बुद्धि मलीन आहे, अशांना पुढें सुख होत नाहीं. म्हणून मुलांनो तुम्ही विद्याश्रमांत चांगलें ज्ञान

मिळवून आत्मसंयमन, मनोनिग्रह, देहविजय, चांगला प्राप्त करून घ्या म्हणजे पुढच्या आयुष्यांतील सर्व कामें सुखासमाधानानें व सहज जणू लीलेनें करतां येतील.

विद्याश्रम संपला म्हणजे **गुरूच्या आज्ञेनें विवाह करावा** असा शास्त्राचा विचार आहे. आतांही जाणतीं मुलें विवाह करण्याच्या आधीं विचार करतील तर बरें होईल. विशेष गुणी माणसानें शक्य असल्यास विवाह न करतां सर्व आयुष्य विश्वेश्वराला अर्पण करून परोपकार, धर्मकार्य, देशसेवा, ह्यांत घालवावें हें त्याला त्याच्या कुळाला व त्याच्या देशाला भूषण आहे. पण हा विचार वीरवृत्तीच्या माणसांविषयीं होय. आपण येथें साधारण नियमांचें विवेचन करीत आहों. तर आतां विद्या पुरी झाल्यावर पुढचीं ओघानेंच येणारीं कर्तव्यें कोणतीं तें पाहूं.

## ६. गृहाश्रमाचे धर्म.

मानवजन्माचा हेतु आत्मोन्नति किंवा जीवाचा परमात्म्याशीं वियोग जाऊन योग होणें. हा विचार जितका जास्त लक्षांत राहील तितका बरा. जीवाला **योगाचा किंवा अभेदाचा** अनुभव येण्यास आतां गृहाश्रमांत आरंभ होणार. विद्या झाली; आतां प्रत्यक्ष अनुभवाचा काळ आला. योगाचा किंवा अभेदाचा धडा गृहाश्रमाच्या पहिल्याच पायरीवर शिकावा लागतो. विवाहविधि ही त्याची पहिली पायरी होय. त्यांत **दोन जीव एक झाले** अशी योगावस्था दर्शविणारें चिन्हीकरण आहे. पाणि म्हणजे हात; पाणिग्रहण म्हणजे हस्त-स्वीकार. विद्याश्रमांत बटूचा हस्तस्वीकार गुरूनें केला होता. गृहाश्रमांतही हस्तस्वीकारानें पत्नी शिष्य आणि पति गुरु असें नातें उद्भवतें, असा विधींतील एक भाव आहे. योग किंवा अभेद शिकविणारा हा विधि मोठा पुण्यवान खरा. वि-वह, विशेष हेतूनें बरोबर घेणें, स्वधर्माचरणासाठीं परस्परांचे सहचर होणें, यावरून विवाह शब्दानें काय बोध होतो तो पहा. मालती आणि माधव यांच्या विवाहप्रसंगीं कामंदकीबाई त्यांना म्हणत्ये—

**प्रेयो मित्रं बंधुता वा समग्रा ।**
**सर्वे कामाः शेवधिर्जीवितं वा ॥**
**स्त्रीणां भर्ता धर्मदाराश्च पुंसां ।**
**इत्यन्योन्यं वत्सयोर्ज्ञातमस्तु ॥**

" वत्सांनो, आजपासून तुम्हीच आपले एकमेकांचे प्रिय मित्र आणि सर्व

प्रकारचे नातेवाईकही तुम्हीच एकमेकांना; सर्व इच्छा सर्व संपत्ति सर्व जीवभाव तुम्ही एकमेकांचे; स्त्रीला पति आणि पतीला स्त्री ही अशी आहे; ध्यानांत ठेवा बरें!" अग्नीच्या समक्ष शपथ घेऊन हें जें नवें नातें पतकरलें तें आत्मोन्नति व्हावी व अंतीं योग साधावा म्हणून हो! तर गृहाश्रमाच्या ह्या पहिल्या पायरीवरून वर चढून जातांना आतां असेच धर्म करावयाचे आहेत कीं त्यांत आपला आत्मा वाढेल व विस्तार पावेल. निरलस उद्योग, दक्षतेचीं संसारकृत्यें, गुरुजनांची सेवा, आप्तांचा मान, पाव्हण्यांचा सत्कार, लहानांचें संगोपन, हे जे गृहाश्रमाचे प्रधान धर्म ते मन मोठें करून पाळावे म्हणून तर गृहाश्रमाची शपथ घेतली. एकलेपणाची स्वतंत्रता सोडली त्याच वेळीं संकुचित स्वार्थ सोडला. आपल्यापुरतेंच पहाण्याचा आपलपोटेपणाचा विचार गृहाश्रमाच्या पवित्र आवारांत खचीत नाहीं. तो पशुधर्म. तो आपण पशु असतांना केला. पतीनें पत्नीची किंवा पत्नीनें पतीची काळजी वाहिली म्हणजे गृहाश्रमाची पूर्तता होत नाहीं. त्यांचें काम कांहींसें निराळें आहे आणि त्यांत ते एकमेकांचे सोबती आहेत. जगांतील गृहींनो आणि गृहिणींनो तुम्हीं आपलाच संसार केला तर त्यांत विशेष काय केलें? स्वतःला थोडें विसरून आपला योग कुटुंबांतील माणसांशीं आणि इतरांशींही न कराल तर तो तुम्हांला धर्म आणि देव हे करावयास लावतील. अनेक प्रकारें धर्मासाठीं आपण कष्ट सोसतों, द्रव्य खर्च करतों, व त्यामुळें स्वतःचें संकुचित सुख विसरण्यास शिकतों हे धर्माचे आपल्यावर महदुपकार आहेत. मुलेंबाळें झालीं म्हणजे रात्रंदिवस कष्ट करून त्यांना वाढवतों यांतही संकुचित स्वार्थ व आपलपोटेपणा बाजूला ठेवण्याचा धडा शिकावा लागतो, हे मुलेंबाळें देणाऱ्या देवाचे किती तरी उपकार. असें नसतें तर आमचे जीव कधींच योग शिकते ना. हें जर खरें तर हळू हळू आपण कुटुंबांतील माणसांच्या व कुटुंबाबाहेरील समाजांतील व देशांतील बंधुभगिनींच्या हितार्थ झटावें हाच परम गृहधर्म दिसतो--दुसरा नव्हे. इंग्रजींत एक वचन आहे कीं **"परोपकाराला आरंभ घरांत होतो पण त्याचा शेवट मात्र तेथें होत नाहीं;"*** ह्यांतील दोन भागांचें तारतम्य नीट लक्षांत आणा. परोपकाराची किंवा अभेदबुद्धीची वाढ तिसऱ्या सेवाश्रमांत व त्याची परमावधि चौथ्या योगा-

---

* Charity begins at home, but it does not end there.

श्रमांत व्हावयाची, पण त्याचा उपक्रम गृहाश्रमांतच झाला पाहिजे. गृहींनीं आणि गृहिणींनीं अनुकूल असतील तीं साधनें परोपकाराला लावावीं व गृहधर्माचें वैभव वाढवावें. जवळ द्रव्य नसेल; नसो. पण ज्ञान देणें, गोड वचन बोलणें, वडिलांशीं नम्रतेनें आणि लहानांशीं प्रीतीनें वागणें, सेवकांशीं कडकपणानें पण सदयतेनें बोलणेंचालणें, दुःखी माणसाचें सांत्वन करणें, आजारी माणसाला औषधोपचार करणें, असे एक काय शेंकडों प्रसंग संसारांत प्रत्यहीं आहेत. त्यांत द्रव्य नाहीं म्हणून अडत नाहीं. **माझा जीव तसा दुसऱ्याचा जीव** हा व्यावहारिक योग मनांत जागृत असला म्हणजे झालें. पहा गृहधर्माविषयीं मनुशास्त्र काय म्हणतें तें—

**तृणानि भूमिरुदकं वाक् चतुर्थी च सूनृता।**
**एतान्यपि सतां गेहे नोच्छिद्यंते कदाचन ॥**

परका कोणी आला तर त्याला बसायला गवताचें आसन, किंवा निदान स्वच्छ जमीन तरी, तहानेल्याला घोटभर पाणी, आणि ' या बसा ' म्हणून आदराचे दोन गोड शब्द, याला तर कोणाच्या घरीं तोटा नाहीं ना ! मग हा सर्वांना साधणारा सनातन धर्म पाळण्यास आपण आळस कां करावा ?

महाभारतांतील शांतिपर्वांत त्या कपोतानें गृहधर्म कसा पाळला तो पहा. घरीं येणारा पारधी आपला वैरी आहे हेंही मनांत आणलें नाहीं. कपोत आणि कपोती एका वृक्षावर घर करून सुखानें रहात होतीं. एके दिवशीं चारा आणण्यास गेली असतां त्या कपोतीला पारध्यानें धरलें. आणि तो पारधी तिला घेऊन त्यांच्याच त्या झाडाखालीं येऊन बसला. तो थंडीनें आणि भुकेनें व्याकुळ झाला होता. तेव्हां मोकळा पण चिंतातुर कपोत जवळच बसलेला पाहून पारध्यानें दोरीला बांधलेली पत्नी त्याला म्हणते " हा पारधी पुढें माझा गळा कापणार खरा, तरी या वेळीं तो आपल्या घरीं पाव्हणा आला आहे व थंडीनें आणि भुकेनें व्याकुळ झाला आहे तर त्याला साह्य केलें पाहिजे. " तेव्हां गृहधर्म स्मरून त्या कपोतपतीनें आपल्या चोंचीनें गवत, काटक्या, सुका पाला आणि एक जळतें कोलीत आणून स्वतः त्या पारध्याजवळ शेकोटी पेटवली व त्याची थंडी दूर केली. मग त्याला खावयास देण्यास आपल्या देहाखेरीज दुसरें घरांत कांहीं नाहीं असें पाहून भाजलेल्या मांसानें पारध्याचें पोट भरावें म्हणून त्या

कपोतानें आपल्या देहाचा यज्ञ करण्याचें मनांत आणून आगींत उडी घातली व प्राण सोडला ! पण म्हणाल ही कथा ? होय, कथा खरी; तरी ती एका तत्त्वाचा बोध करीत आहे. गृहधर्माचा आदर्शविचार यांत चांगला गोंवला आहे. किती कठोर तरी हा धर्म !

विचारी गृही आणि विचारी गृहिणी ह्यांनीं आपली कुटुंबाची कल्पना व्यापक केली पाहिजे. पतिपत्नी, मुलेंबाळें, चाकरमाणसें, वाडवडील, इष्टमित्र, ह्यांचें खरें कुटुंब बनतें. अशा कुटुंबाचें हित तें माझें हित हा विचार गृहधर्माचा मुख्य आधार होय,–तो त्याचा जीवप्राण होय. तसेंच आजच्या मन्वंत, **आपला देश** म्हणून कांहीं आहे व त्याची सेवा आपल्याला कांहीं तरी केली पाहिजे, हाही विचार पुढें पुढें गृहधर्मांत आणला पाहिजे. देशहिताच्या कोणत्या तरी कामाला हातभार लावणें, देशहिताचे उद्योग करणें, मुलेंबाळें देशहितवादी होतील अशी त्यांस विद्या शिकविणें हेंही आज श्रेष्ठ गृहधर्माचें अंग होय. याप्रमाणें विचारानें वागूं तर गृहाश्रमांत आपल्याला पूर्णपणें **कुटुंबकुटुंबी** व अंशतः **देशकुटुंबी** होतां येईल. पुढच्या आश्रमांत या धर्माची वाढ व्हावयाची आहे पण त्याचा पाया गृहाश्रमांत घातला पाहिजे. तिसऱ्या आश्रमांत जीवानें **वसुधाकुटुंबी** व चौथ्यांत **विश्वकुटुंबी** होऊन अंतीं परमयोग साधावयाचा आहे, त्याचीं कुटुंबहित व देश-सेवा हीं उत्तम साधनें होत.

हाच विचार निराळ्या शब्दांनीं सांगावयाचा म्हणजे गृहाश्रमांत आम्हीं ऋण फेडावयाचें असतें. त्याचें रोज स्मरण व्हावें म्हणून धर्मांत सांगितलें आहे कीं गृहाश्रमांत रोज पांच यज्ञ करावयाचे असतात. ते 'सनातनधर्मसंवादाच्या' ४३व्या प्रश्नोत्तरांत असे दिले आहेत. " विद्याभ्यास, ईश्वरोपासना, पूर्वजांस तर्पण, भूतांसाठीं व वाट चुकलेल्या जनावरांसाठीं कांहीं अन्न काढून बाहेर ठेवणें, व गरीब माणसांस अन्नवस्त्र देऊन किंवा अन्य प्रकारें साह्य करणें, हे रोजचे **पंचयज्ञ** होत. " ह्या पंचयज्ञांचा विस्तृत विचार येथें करतां येत नाहीं. आपण इतकेंच शिकावयाचें कीं विद्या वगैरेंनीं जसें देवांचें, ऋषींचें, व मानवजातीचें ऋण फेडावयाचें, तसेंच आजच्या मनूंत कुटुंबऋणाइतकेंच महत्त्वाचें **लोकऋण** आहे तें देशकार्याला इमानेंइतबारें साह्य केल्याशिवाय फिटावयाचें नाहीं. ही गृहधर्माची मन्वंतरागत पुरवणी होय.

मी धर्माचें विवेचन करीत आहें, आणि हे विचारही त्याचेच अंगभूत आहेत. जेथें आत्मविद्या समजेल, जेथें आत्मविकास होईल, तेथेंच कुटुंबाशीं व राष्ट्राशीं योग होईल. ह्या योगाचींच कुटुंबसेवा व देशसेवा हीं फळें होत. हें कार्य जरा दुर्घट खरें तरी गृही आणि गृहिणी घरींदारीं संतोषानें, ज्ञानानें, आणि एकोप्यानें वागतील, तर तें कांहींसें सुकर होईल. कुटुंबसेवा, देशसेवा, लोकसेवा, हें काम कधीं पतीच्या तर कधीं पत्नीच्या वांट्याला येईल. तर त्यांनीं एकमेकांला मदत करावी हा त्यांचा गृहधर्म होय. आज मितीला कर्त्या पुरुषांस स्त्रियांनीं, व परोपकारी स्त्रियांस त्यांच्या पतींनीं, मनोभावानें राष्ट्रहिताच्या आणि लोकहिताच्या कामीं साह्य केल्याचीं शेंकडों उदाहरणें पाश्चिमात्य देशांत सांपडतील, व इकडेही कांहीं मिळतील. त्याच्या उलट प्रकार झाला, म्हणजे पतीच्या कामांत पत्नीनें मनोभावानें मदत केली नाहीं किंवा कर्त्या स्त्रीला पतीनें साह्य केलें नाहीं, तर ' अविवाहित राहिलेलें बरें ' असेही उद्गार निघाल्याचीं उदाहरणें आहेत. दाशरथी रामाला पित्याची आज्ञा पाळण्यास वनांत जावयाचें तेव्हां पत्नी सीता आड आली नाहीं, 'म्हाताऱ्यांचें काय ऐकतां, आपण निराळें बिऱ्हाड करून राहूं' असें म्हणाली नाहीं, तर उलट पुत्रधर्म पाळण्यास पतीला मदत करती झाली. **डा० आनंदीबाई जोशी एम. डी.** ह्यांना अमेरिकेंत जाऊन विद्या शिकण्यास पति गोपाळरावांनीं मनोभावानें मदत केली. ह्यावरून पतिपत्नींची एकमेकांविषयीं कशी वृत्ति असावी हें तुमच्या ध्यानांत येईल. ही वृत्ति बनण्यास विद्याश्रमांत चांगल्या गुरूकडून मिळालेली विद्या फार उपयोगी पडते. तर मुलांना व मुलींना विद्या देणारा विद्याश्रम हा गृहधर्माचरणाचा मोठा आधार होय.



चारही आश्रमांतील स्त्रीपुरुषांनीं म्हणजे सामान्यतः प्रत्येक माणसानें धर्मवान असावें. हा धर्मवानपणा मनूनें दहा गुणांच्या रूपानें कथन केला आहे. तो गुणसंपन्नतेचा विचार गृहाश्रमाला जास्त लागू पडतो. कारण विद्याश्रमांत केवळ त्या गुणांचें शिक्षण घ्यावयाचें असून, ते जर गृहाश्रमांत अंगीं आणले नाहींत तर पुढचे आश्रम

साधणें कठीण आहे. म्हणून त्या गुणांचा आश्रय गृही आणि गृहिणी यांनीं अवश्य केला पाहिजे. ते गुण असे—

**धृतिः क्षमा दमोऽस्तेयं शौचमिंद्रियनिग्रहः ।**
**धीर्विद्या सत्यमक्रोधो दशकं धर्मलक्षणं ॥**

या वचनावरून असें उघड दिसतें कीं धर्म हा वर्तनांत दिसला पाहिजे, व जेथें असे गुण प्रत्यक्ष आचरले जातील तेथेंच धर्मवानपणा आहे म्हणून समजावें.

**धृति** म्हणजे मानसिक धैर्य. सदाचरणाचा आत्मा कोणी असेल तर हा गुण होय. प्रत्यहीं, नव्हे क्षणोक्षणीं, याची गरज लागते. बरें वाईट, स्तुति निंदा, याची पर्वा न करतां हातीं येईल तें कर्तव्य दक्षतेनें व चोख करावयास लावणारा याशिवाय दुसरा गुण नाहीं.

**क्षमा** ही पृथ्वीसारखी सहनशीलता. संसाराचे कष्ट, दुःखाचे प्रसंग, सुखाचा उन्माद, इतरांचीं कटु वचनें, ह्यांना वश न होतां शांतीनें रहाण्यास शिकविणारा हा गुण गृहाश्रमाचें सौभाग्य समजला जातो.

**दम** म्हणजे चित्त स्वाधीन ठेवणें. अंतर्यामांत स्थिरता नसेल तर कोणतेंही संसारकृत्य व्यवस्थेनें व्हावयाचें नाहीं. प्रत्येक कृत्य दक्षतेनें केलें तर तें जीवाच्या योगाला पोषक होईल. हा क्रियायोग मनुष्याची योग्यता अनायासें वृद्धिंगत करतो. ‘ योगः कर्मसु कौशलं ’—योग मिळवूं पहाणारांनीं सर्व कार्यांत दक्षतेनें वागलें पाहिजे—हें गीतेंतील बोधवचन येथें चांगलें लागू पडतें.

**अस्तेयं** म्हणजे न्यायबुद्धीनें वागणें. ही बुद्धि जागृत असली तर संसारांतील किती तरी कलह कमी होतील. तसेंच वडिलांचा मान राखावयास सांगणारी आणि लहानांशीं प्रेमानें वागावयास लावणारी हीच न्यायबुद्धि होय.

**शौच** म्हणजे पवित्रता. वाईट विचार, वाईट आचरण, वाईट भाषण ह्यांचा अंगीं मळ न लावणें हा ह्या गुणाचा महिमा होय.

**इंद्रियनिग्रह** म्हणजे आपलीं सर्व इंद्रियें आपल्या हुकमांत ठेवणें. उदाहरणार्थ जीभ घ्या. निंदा करणारी जीभ, मर्मभेदक बोलणारी जीभ, खोटें सांगणारी जीभ, एकसारखी वाऱ्यासारखी बडबड बडबड करणारी जीभ, ही जी जिव्हारूप विषारी नागीण तिला जो स्वाधीन ठेवील तो पुरुष गृहाश्रमांत देवासारखा—ती स्त्री गृहाश्रमांत देवीसारखी—मानण्यास हरकत नाहीं.

**धी** म्हणजे सद्बुद्धि किंवा विवेक. विचार तसा आचार. ज्याचे विचार विवेकाचे तो वर्तनांतही विवेकानेंच वागेल. आत्मविद्येंत बुद्धि ही आत्म्याची सख्खी बहीण मानली आहे. धीमान माणूस सागरासारखा गंभीर असावयाचा. ' मनःपूतं समाचरेत् ' या न्यायानें मनाला जें पवित्र वाटेल तेंच करीन, भिणार नाहीं किंवा विपरीत आचरण करणार नाहीं, इतका निष्ठुर गृहधर्म आचरूं लावणारी ती सौभाग्यवती बुद्धि होय.

**विद्या** ही मुख्यतः आत्मविद्या, व तिच्या छायेखालीं वावरणाऱ्या इतर विद्या. आत्मविद्या किंवा धर्मशिक्षण हें नसेल तर नुसती इतर विद्या माणसाला स्वार्थपर करील,–आणि स्वार्थाशीं तर गृहाश्रमांत झगडावयाचें आहे. म्हणून म्हटलें आहे ' विद्या धर्मेण शोभते '–सर्व ज्ञान, सर्व विद्या, सर्व शिक्षण, शुभदायी होण्यास त्याला धर्मज्ञानाची किंवा आत्मविद्येची जोड करून दिली पाहिजे. विद्या शब्दाचा साधा अर्थ घेतला तरी गृहाश्रमांत विद्येचा व्यासंग असावा, ज्ञान्यांचे ग्रंथ नेहमीं वाचावे, म्हणजे आपली संसाराविषयीं व जगाविषयीं दृष्टि पालटून संसाराची बाधा–संसाराची विवंचना–कमी होईल.

**सत्य** म्हणजे काय हें कोणीं कोणाला सांगावयास नको. शब्दाचा अर्थ सोपा आहे; तो गुण अंगीं आणून आचरणांत तो प्रगट करणें हेंच काय तें कठीण आहे. पण तें शिकण्याची उत्तम जागा गृहाश्रमच होय. तेथें असत्याचरणाचे मोह फार, आणि जेथें मोह फार तेथेंच ते तरून जाण्याची योग्यता मोठी मानली आहे. तर गृही आणि गृहिणी यांनीं देवाला स्मरून मनोभावानें सत्य चिंतावें सत्य बोलावें आणि सत्य चालावें हेंच उचित होय.

**अक्रोध !** क्रोध नसावा हें शेवटीं सांगितलें; कां तर त्याचा विसर पडूं नये म्हणून. ' अक्रोधेन तर क्रोधं सत्येन च तरानृतं '–जसा असत्याला तरून जाण्यास सत्य तसा क्रोधाला तरून जाण्यास अक्रोध ऊर्फ शांति हा एकच उपाय होय असें शास्त्र सांगतें त्याचा गृहींनीं आणि गृहिणींनीं अवश्य अनुभव घेऊन पाहावा.

हा गृहाश्रमांत कमावावयाच्या मुख्य मुख्य गुणांचा-दशलक्षणी धर्माचा–विचार झाला. गृहधर्माचें धोरण काय व तें कसें संभाळावें याचें विवेचन आधींच झालें आहे, तेव्हां हा जरा लांबलेला भाग आतां आटपता घेऊं.

उत्तम गृहाश्रम––पण उत्तम म्हणजे परोपकाररत असा जो तो––एक

पुरुषार्थ मानला आहे. संसाराला धर्म म्हणून मानणें व तशी वृत्ति ठेवून वागणें हा **पुरुषार्थ** म्हणजे पुरुष जो आत्मा त्याच्या उन्नतीचें साधन. गृहाश्रमाला सनातनधर्मात मोठा मान आहे. सनातनधर्मात विवाह हा पवित्र मानला आहे. पण हें सर्व कधीं तर आत्महिताचें असेल तेव्हां. आणि आत्म्याचें हित म्हणजे त्याचा विस्तार किंवा विकास. **सर्वात्मभाव हें आत्महिताचें श्रेष्ठ साधन** भागवतांत जागजागीं सांगितलें आहे. त्याचा साक्षात अनुभव घेण्याची जागा हा संसार असें मानूं व त्याप्रमाणें वागूं तर तो धर्म होईल—नाहीं तर अधर्म. असा अनुभव घेण्यास येथें सोपें जातें म्हणून व इतर कारणांमुळें शास्त्र म्हणतें—**ज्येष्ठाश्रमो गृही** ! गृहाश्रम श्रेष्ठ म्हणतात. पण तो मूळचाच तसा नाहीं, त्याला श्रेष्ठ केला पाहिजे. जर तो गृही आणि गृहिणी उदार बुद्धीनें वागून श्रेष्ठ करतील तर श्रेष्ठ. नाहीं तर तो आश्रमच नव्हे, तो धर्म नव्हे, तो आत्मोन्नतीचा मार्ग नव्हे !

गृहाश्रमाची इतकी महती गाइली तरी तो शेवटचा मुक्काम नव्हे. अजून पुढें दोन आश्रम आहेत. आपल्या कामाची मर्यादा विशेष वाढविण्यासाठीं, आपल्या आत्म्याचा विकास जास्त करण्याकरितां, पुढच्या आश्रमांचे धर्म अंगावर घेतले पाहिजेत. मुलेंबाळें झाल्यावर किंवा एकमेकांच्या परवानगीनें गृही आणि गृहिणी ह्यांनीं तिसरा आश्रम स्वीकारावा असें शास्त्र आहे. तर आजच्या बदललेल्या मनूकडे पाहून तिसऱ्या आश्रमांत स्त्रीपुरुषांनीं काय करावयाचें तें पाहूं.

एक गोष्ट मात्र पुन्हा सांगावयाची ती ही कीं विद्याश्रमांत विद्या शिकलों ती पुढें तसें आचरण करावें म्हणून. इतका वेळ प्रतिपादन केल्याप्रमाणें वागून संसार धर्मवान करतां येणें हें सद्विद्येचें उत्तम फळ. मनु म्हणतो ' अधीत्य चानुवर्तंते ते यांति परमां गतिं ' ! विद्या शिकून जे तसे वागतात तेच परम गतीला जाऊन पोहंचतात. गृही आणि गृहिणी यांनीं आपल्या अंगीं कोणते गुण आणावयाचे याचें शिक्षण विद्यार्थी आणि विद्यार्थिनी यांना चांगल्या गुरूनें दिलेंच आहे. त्याप्रमाणें वागाल तर न्याय, विवेक, उद्योगिता, स्वार्थत्याग, आत्मसंयमन, वगैरे गुणांनीं विभूषित व्हाल आणि तुम्ही पति पत्नी पिता माता धनी आणि जानपद ह्या नात्यानें थोर पदावर चढाल. गृहाश्रमांत आपण परमेश्वराचे नोकर आहों या भावनेचा जितका उदय होईल तितकी बुद्धि सत्कार्याला

जास्त प्रवृत्त होईल. धनी किंवा यजमान हा भाव सोडून सर्वांचे सेवक असा भाव हळू हळू मनांत वाढूं द्या, म्हणजे गृहाश्रम संपवून सेवाश्रमाचा अंगीकार करण्याकडे मनाचा ओढा आपोआप होईल.

## ७. सेवाश्रमाचे धर्म.

जीवाचा देवाशीं योग होणें ह्याचें एक स्वरूप **सर्वात्मभाव** होय. गृहाश्रमाच्या आरंभीं संकुचित स्वार्थानें मन घेरलें होतें, परंतु धर्मानें आणि देवानें असा अनुभव दिला कीं तेणेंकरून आत्मा वाढला, त्याचा विकास झाला, आणि त्यामुळें मनुष्याचें मन सृष्टिनियमांप्रमाणेंच उदार झालें. तर सहजच असा प्रश्न येतो कीं **अनुदार** मन आणि **उदार** मन यांचे धर्म—म्हणजे तशा माणसांच्या आत्मोन्नतीचे नियम—एकच असतील काय? छे, अशक्य. एकच कसे असतील? लहान अर्भकांचें वाटीभर दुधानें पोट भरतें; पण मुलांनो तुमचें भरणार नाहीं. त्याप्रमाणें अनुदार माणसाला चार माणसें तेव्हडीं माझीं म्हणण्यांत आनंद वाटतो, पण उदार प्रकृति ज्याची आतां झाली त्याला तुम्ही अनेक माणसांना माझीं म्हणूं देणार नाहीं, त्याची ममता आकुंचित करूं पहाल, तर त्याला दुःख होईल. तो आतां मानवजातीवर प्रेम करूं लागल्यामुळें त्याचा धर्म व आश्रमही बदलला. म्हणजे तिसरा जो सेवाश्रम तो अशा स्वाभाविक बनलेल्या उदार वृत्तीचा आश्रम होय. ह्या आश्रमाची जबाबदारी किंवा येरव्हीं जड वाटणारें ओझें ज्याला तितकी शक्ति असेल त्याच्याचकरितां आहे, व याच दृष्टीनें मी आतां प्रतिपादन करणार आहें.

उदार माणसांचें मन ' मी आतां देवाची, धर्माची, आणि मानवजातीची जास्त सेवा करीन ' असें झालें म्हणजे त्यांच्या कामाची—त्यांच्या स्वभावज कर्मांची—व्यवस्था लावण्याचें काम मात्र शास्त्रकारांनीं केलें आहे. शास्त्रांत वचनें आहेत म्हणून मनुष्यें उदार व्हावयाचीं नाहींत, तर स्वानुभवानें उदार बनलेल्या मनुष्यांना शास्त्रवचनें जीं आहेत तीं असा मार्ग किंवा स्वधर्म लावून देतात कीं थोडक्या वेळांत व सोपेपणानें त्यांची जास्त उन्नति व्हावी. मुंबईहून पुण्यास जावें अशी इच्छा आगगाडी उत्पन्न करीत नाहीं, तर जेव्हां मुंबईहून पुण्यास जावें अशी मनुष्य इच्छा करितो तेव्हां आगगाडी त्याला थोड्या वेळांत आणि सुखानें इष्टगतीला जाऊन पोहंचण्यास मदत करते. थेट तसाच हा तृतीयाश्रमाविषयींचा प्रकार समजावा.

मनुष्याचें कर्तव्यकर्म त्याच्या अधिकारावर—म्हणजे अंगच्या गुणांवर, शक्तीवर, योग्यतेवर—अवलंबून आहे हा विचार पहिल्या आणि दुसऱ्या आश्रमांना लागू नाहीं असें नाहीं. ते खरेपणानें ' आश्रम ' म्हणून पाळतां येण्यास, त्यांची पूर्तता धर्माच्या खऱ्या मनोगताप्रमाणें होण्यास, माणसाला तशी स्वाभाविक योग्यताच लागते. पण हें सामान्यतः, लोकांस आज सोपपत्तिक रीतीनें धर्मशिक्षण मिळत नसल्यामुळें, त्यांच्या लक्षांत येत नाहीं. ज्याच्या अंगीं कांहीं विशेष आत्मगुण असतील तोच खरा द्विज—द्वितीय जन्म पावलेला—असून त्याच्याचकरितां चार आश्रमांचे धर्म सांगितले आहेत. गुणहीन व अबुद्ध माणसाला योग्यतेच्या अभावीं ते पाळतां यावयाचे नाहींत. गुण नसतील तर विद्याश्रम फलदायी होणार नाहीं,—विद्या ही अमृतवल्ली असून ती विषवृक्ष बनेल. धर्मजीवन नसेल तर फक्त पोटभरू विद्या लोक घेतील व स्वार्थपरायण बनतील. गुण नसतील तर दुसरा आश्रम तो ' ज्येष्ठाश्रमो गृही ' होणें नाहीं. तें केवळ अजाण माणसांचें ' लग्न ' म्हणजे एकत्र येणें होय—धर्मसहेतुक ' विवाह ' नव्हे. गुण नसतील तर चौथा जो विश्वकुटुंबी योगाश्रम तो ' योगाश्रम ' व्हावयाचा नाहीं; तो भगवें वस्त्र घेऊन लोकांस फसविणाऱ्या गोसाव्यांचा अखाडा होईल—देवाचा आशीर्वाद दुःखाकुल जगाला आणून पोहंचविणाऱ्या योगियोगिनींचा पुण्याश्रम व्हावयाचा नाहीं. तद्वतच, गुण नसतील तर वरवर सेवाश्रम पतकरून औदार्याचा आव घालणारे अधर्म करीत आहेत असें म्हणावें लागेल. त्यांचें तें काम नव्हे—तो त्यांचा स्वधर्म नव्हे.

आपली शक्ति किती आहे तें पाहून आपण काम पतकरावें. कोणत्या आश्रमाची जबाबदारी घ्यावयाची हें विवेकानें पाहिलें पाहिजे. म्हणून मनु म्हणतो ' आत्म्याला संतोष होईल तें करावें. ' ( मनु० ४. १६१ ). आत्मसंतोष, उल्लास, आनंद, सहजस्वभाव,—हा जो आहे तो सेवाश्रमाचा आत्मा व आधार होय. असेच जीव सेवाश्रम पतकरणार व पतकरतात. स्वार्थत्याग, यज्ञ, आत्मयज्ञ, हा आनंदानें करावयाचा. विद्याश्रम सुखानें पतकरावयाचा, गृहाश्रम समाधानानें करावयाचा, तसा सेवाश्रम सुखासमाधानानें मन तिकडे ओढलें जात असेल तर करावयाचा. ज्यांच्या मनाची अशी तयारी नाहीं त्यांना हे धर्म सांगितले नाहींत. सारांश काय कीं धर्माचा कोणावर जुलूम नाहीं; केवळ विचारील त्याला बोध करणारा आणि मदत मागेल त्याला साह्य करणारा धर्म आहे.

हें रहस्य, मुलांनो, तुम्ही जरा विचार करून ध्यानांत आणा म्हणजे आश्रमधर्मांची महती तुम्हांला कळेल. आतां मी जो सेवाश्रम सांगणार आहें तो अशा उदार मनोवृत्तींचा स्वाभाविक स्वधर्म म्हणून सांगणार आहें. जेथें अशी वृत्ति उदय पावली नाहीं तेथें गृहाश्रमाचा अनुभव पुरा झाला नाहीं असें समजावयाचें. ज्ञानेश्वर म्हणतात ' जंववरी अर्जुना । तो बोध भेटेना मना । तंवचि या साधना । भजावें लागे ॥ ' तो पुरा होण्यास कदाचित आणखी कांहीं जन्म घ्यावे लागतील, कारण तितका आत्म्याचा विकास होण्यास कालावधीची गरज आहे. कांहीं माणसें अगदीं स्वार्थपर असा संसार जन्मभर करीत असतात, व त्यांचा वरवर पहाणाराला कधीं कधीं राग येतो; पण मीं नुकतेंच सांगितलेलें **आत्मसंकोच** आणि **आत्मविकास** हें नैसर्गिक कारण लक्षांत ठेवलें म्हणजे मुलांनो मोठेपणीं तुम्ही अशा अज्ञ माणसांवर कधीं रागावणार नाहींत अशी माझी खातरी आहे.

एक कथा आठवली ती सांगतों. कोणे एके प्रसंगीं मत्स्ययुगाचे ठायीं देवानें माशाचें रूप घेतलें. तो मासा आधीं वाटींत राहिला व चांगला सुखानें राहिला. पुढें त्याचें अंग मोठें होत गेलें. त्याला गंगाळ पुरे ना, त्याला विहीर पुरे ना, त्याला तळें पुरे ना, आणि शेवटीं त्याला महासागरही पुरे ना इतका त्याचा देह मोठा झाला.* आतां पहा तो महासागरनिवासी मासा वाटींत राहील काय ? त्याला वाटींतील संसाराचे धर्म पुरतील काय ? संकोचधर्म त्याचें आतां काम करतील काय ? नाहीं. त्याचप्रमाणें वाटींतील मासा हा महासागरांत सुखानें राहूं शकणार नाहीं. तो तेथें भांबावून जाईल, मोहित होईल, व कदाचित प्राणांसही मुकेल. त्याचा आश्रम वाटी आणि दुसऱ्याचा आश्रम महासागर. वियोगापासून योगाप्रत जाणाऱ्या, संकोच टाकून हळू हळू विकास पावणाऱ्या, जीवाची गोष्ट अशीच आहे व असाच विचार शास्त्रांत ' अधिकार ' किंवा योग्यता या रूपानें सांगितला आहे. तो या दृष्टीनें पहाल तर मोठेपणीं समजूं लागल्यावर तुमची धर्मशास्त्राविषयींची पूज्यबुद्धि आणि आदरबुद्धि वाढेल. ज्याचे अंगीं शक्ति असेल—आत्म्याची गुणवत्ता असेल—त्यानें तसे धर्म पतकरावयाचे आहेत,

---

*ही कथा रा. गजानन भास्कर वैद्य-कृत ' विष्णूचे अवतार ' व्याख्यान तिसरें यांत आली आहे.—**वैद्य ब्रदर्स.**

असें न्यायानें बोलणारें शास्त्र आम्हां आर्यांच्या अनादराला कधींही पात्र होऊं नये. ज्यांना लोकहित नको, ज्यांना देशसेवा नको, ज्यांना धर्मकार्य करावयास नको, ज्यांना परोपकार नको, ज्यांना **स्वार्थाश्रम** आनंद देत आहे—स्वार्थाच्या शेजारीं आश्रम हा पवित्र शब्द जोडूं नये पण चित्ताकर्षक व्हावी म्हणून तशी जोडी येथें केली, तर स्वार्थाश्रम ज्यांना आनंद देत आहे—ते वाटींतील माशांसारखे आहेत व त्यांचा स्वभावज धर्मही तसाच ठरलेला आहे. परंतु ज्यांची अहंता सर्वदेशी होत आहे, जे विकासधर्माचे पुरोहित बनले आहेत, जे परोपकारांत आनंद मानूं लागले आहेत, जे कुटुंबीयांशिवाय इतरांनाही स्वजन म्हणूं लागले आहेत, ते महासागरांतील माशांसारखे. त्यांच्या सुखाचे, त्यांच्या आत्महिताचे, त्यांच्या आत्मोन्नतीचे, नियम निराळे. ते नियम सेवाश्रमाच्या अंगभूत असलेले धर्म होत.

जे आत्मोन्नतीच्या खालच्या पायरीवर आहेत, जे अनुदार आहेत, त्यांना सेवाश्रमाचे विचार कडू लागतील; पण त्यांनीं असें समजावें कीं ते यांच्यासंबंधानें नाहींत. सातव्या इयत्तेंतील अभ्यासाचे विषय सांगूं लागलों तर पहिल्या इयत्तेंतील मुलाला तें ओझें वाटून दुःख होईल, पण ज्याची सहावी इयत्ता पुरी झाली आहे तो सातव्या इयत्तेंतील अभ्यास कोणी समजवून दिले तर आनंद मानील व सातव्या इयत्तेची जास्त माहिती विचारील. असाच विचार प्रस्तुत विषयाला लागू आहे.

हे विचार लक्षांत ठेवून आतां सेवाश्रम म्हणजे काय आणि त्याचे धर्म कोणते ते पाहूं.

हा पूर्वींचा वनाश्रम, म्हणजे वनांत जाऊन रहाण्याचा आश्रम. एके पायरीवरील आध्यात्मिक प्रगतीला थोडी एकांताची गरज आहे, ही ह्या आश्रमांतील मूलभूत कल्पना होय. पहिले दोन आश्रम जसे प्रवृत्तीचे, तसे दुसरे दोन निवृत्तीचे होत. सेवाश्रमापासून, मन थोडें निवृत्त होण्यास म्हणजे आत्महिताचा बोध गोळा करण्यास लागतें. थोडा उद्योग थोडा निवृत्तपणा, किंवा बाहेर सर्व उद्योगाचा पसारा पण मनाची वृत्ति निवर्तनयुक्त, ह्याची मन-बुद्धि-आत्मा ह्यांच्या ऊर्जितावस्थेला मदत होते. **वन हें मनाच्या एकांततेचें चिन्ह होय.** आजच्या मनूंत वनाश्रमाची गोष्ट काढली तर अविचारी माणसें तो वेडपणा मानतात, पण शास्त्राचा विचार जीवधर्मावर स्थापिलेला आहे. बोधाचें

पीक पिकावें म्हणून चालू उद्योगांतच मनाचें निवर्तन हें आत्मोन्नतीला हितकारक आहे हें अध्यात्मांत तर खरेंच आहे, परंतु आजच्या व्यवहारांत देखील राजे, मुत्सद्दी, ग्रंथकार, वगैरे आयुष्यांतील काम आटोपून शेवटीं विश्रांति घेतात आणि सरकार तर आपल्या नोकरांना पेन्शन देऊन घरीं रहाण्यास सांगतें, तेव्हां वनाश्रमाचाच विचार निराळ्या रूपानें कबूल केला जातो असें म्हणण्यास हरकत नाहीं.

आतां आजच्या मनूंत हा आश्रम कसा पाळावयाचा तें पाहूं.

**सेवा हा भक्तीचा पर्यायशब्द होय.** हा सेवाधर्म आचरणारा जीव इतरांशीं आपला योग करतो व त्यांना आपल्यासारखे मानतो. सेवाश्रम म्हणजे धर्मसेवा आणि लोकसेवा यांत घालविण्याचा आयुष्याचा भाग. जीव हा वियोगापासून योगाकडे चालला आहे, तेव्हां जसजसा त्याचा विकास होतो तसतसा तो जास्त जास्त जीवांशीं स्वभावतःच ऐक्य करूं लागतो. असें होत असतां गृहधर्माची परमावधि म्हणजे पूर्णपणें **कुटुंबकुटुंबित्व** आणि अंशतः **देशकुटुंबित्व** अशी आपण पाहिली. आतां सेवाधर्माची परमावधि म्हणजे पूर्णपणें **देशकुटुंबित्व** आणि अंशतः **वसुधाकुटुंबित्व** असा आदर्शविचार पुढें ठेवून विवेकी माणसांनीं सेवाश्रमाचा अंगीकार करावयाचा.

सेवाश्रमाचा अंगीकार करण्यास चालू व्यवसाय सोडलाच पाहिजे किंवा तो बदललाच पाहिजे असें नाहीं. पण मनाची वृत्ति मात्र बदललेली असावी. ती बदललेली नसेल तर तो सेवाश्रम नव्हे. उद्योग सोडून किंवा पेन्शन घेऊन घरीं स्वस्थ बसणें ह्याला मी सेवाश्रम म्हणत नाहीं. कांहींच उद्योग न करणें हें माणूसपणाचें लक्षण नव्हे, आणि धर्माचाही बोध असा आहे कीं कर्म हें केलेंच पाहिजे. पण महत्त्वाचा मुद्दा निराळा आहे. **स्वार्थपर जीवनयात्रा परार्थपर करणें तो सेवाश्रम.** उद्योगाचें फळ गृहाश्रमांत बहुतेक स्वतःकरितां होतें तें आतां सर्वदेशीं अहंता झाल्यामुळें मोठ्या भक्तीनें धर्मसेवेकडे किंवा लोकसेवेकडे किंवा देशसेवेकडे किंवा अखिल मानवजातीच्या हिताकडे लागणार. '**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन**'—तूं आपलें सर्व काम कर पण त्याचें फळ स्वतःकरितां घेऊं नको—हा जो गीतेचा महाबोध तो गृहाश्रमापेक्षां सेवाश्रमाला लावणें जास्त सयुक्तिक दिसतें.

फळ नको तर माणूस उद्योग करणार नाहीं असें कोणी म्हणतात पण तें

खरें नाहीं. फळाची इच्छा सोड हें अज्ञ माणसाला धर्म सांगत नाहीं, व ती त्याला सोडतांही येणार नाहीं. उलट ज्ञानेश्वर म्हणतात कीं ' फलत्यागयुक्त कर्माची गोष्ट अज्ञ माणसाजवळ थट्टेंतही काढूं नको.' उद्योग कर पण फळ सोड हा धर्म गृहाश्रमाचा नव्हता. फळ घे तें माझें म्हण परंतु थोडेंसें दुसऱ्याच्या कामाला लाव असा श्रेष्ठ गृहधर्म सांगण्यांत व आचरण्यांत आला, व म्हणून आतां ' उद्योग कर पण सर्व फळ माझें न म्हणतां दुसऱ्याच्या कामीं लाव ' असा सेवाश्रमाचा महाबोध ऐकण्यास जीव तयार झालेला आहे. ज्याला आतां स्वतःला फळ घेणें म्हणजे मरणासारखें दुःख होत आहे तोच जीव पृथ्वीच्या पाठीवर सेवाश्रमाचा अधिकारी. तो उद्योग कसा थांबवील! तो आतां बहुसंख्य जीवांची काळजी वाहूं लागलेला; तो आतां ईश्वराचें काम करूं पहाणारा! अशा त्या ज्ञानवान जीवाला निरुद्योगी किंवा आळशी होतांच यावयाचें नाहीं. त्याचा देव जर रात्रंदिवस काम करीत आहे तर हा भक्त जगाचें हित विसरून कर्महीन व धर्महीन कसा होईल ! स्वहितासाठीं संसारी माणूस जसा रात्रंदिवस खपतो तसाच हा सेवाश्रमी भक्त परहितासाठीं नेटानें खपणार. दोघांची मनोवृत्ति मात्र निराळी. एकाची स्वहितांत गढलेली, दुसऱ्याची स्वहित सोडून लोकहितांत गढलेली. म्हणजे—

**सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वंति भारत ।**
**कुर्याद् विद्वांस्तथाऽसक्तः चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥**

(स्वार्थाच्या आसक्तीनें अज्ञ माणूस उद्योगांत जितका गढलेला असतो तितकाच ज्ञानीही लोकहितार्थ उद्योगांत गढलेला असतो,—पण स्वार्थबुद्धि सोडून) ह्या गीतावचनाप्रमाणें तो वागणार. हाच महत्त्वाचा विचार ज्ञानेश्वर असा गातात— ' देखें फळाचिया आशा । आचरे कामुक जैसा । कर्मी भर होआवा तैसा । निराशाही ॥ जे पुढतपुढती पार्था । हे सकळ लोकसंस्था । रक्षणीय सर्वथा । म्हणऊनियां ॥ मार्गाधारें वर्तावें । विश्व हें मोहरें लावावें । अलौकिक नोहावें । लोकांप्रति ॥ ' तर असा स्वतःसाठीं फळ न ठेवणारा ज्ञानवान सेवाश्रमी आळशी व भुईला भार होईल याची विवंचना धर्मचिकित्सकाला नको आहे. तुमचें आमचें काम इतकेंच कीं सेवाश्रमाचे आदर्शविचार आणि अशा लोकहितपर सज्जनांचें आचरण आपल्या पुढें ठेवून तसे गुण अंगीं आणण्याचा व आत्मविकास करण्याचा आम्हीं मनोभावानें प्रयत्न करावा.

तर गृहाश्रमाच्या पुढें पाऊल टाकून सेवाश्रम पतकरणारा आतां प्रत्येक काम जास्त हौसेनें व चांगलें करील. कारण त्याला तें देवाला अर्पण करावयाचें आहे, त्याला आतां अनेकांचें हित पहावयाचें आहे, त्याला आतां ईश्वराच्या कार्याला मदत करावयाची आहे ! ' तरी उचित कर्मे आघवीं । तुवां आचरोनि मज अर्पावीं । परी चित्तवृत्ति विन्यसावी ॥ आत्मरूपीं ॥ ' अशी त्याची मनोवृत्ति मात्र निवर्तनयुक्त असणार म्हणून तो सेवाश्रमी.

ज्याला धर्मशिक्षण नाहीं, ज्याला आत्मविकास करण्याचा विचार अवगत नाहीं, असाच माणूस त्याच्या स्वतःच्या गरजा भागल्या म्हणजे उद्योग सोडून आळशी व निष्काळजी होण्याचा संभव असतो. ज्याची परहितबुद्धि वाढली, ज्याच्या स्वार्थाच्या भिंती आत्मविकासतेजानें फुटून पडल्या, ज्याच्या उपयोगितेला आतां मर्यादा नाहींशी झाली, त्याला आळस करीन म्हणेल तरी करतां यावयाचा नाहीं. तो परहित जपेल, तो परहित चिंतील, तो परहित साधील, तो परहितार्थ जगेल, तो परहितार्थ मरेल, व मरूनही तो परहितार्थ उरेल ! हा विचार तर्कापेक्षां स्वानुभवानें जास्त पटणारा आहे. ' इतकी मेहनत मीं स्वतःकरितां केली नसती, पण संस्था चालली पाहिजे, सार्वजनिक काम झालें पाहिजे, म्हणून हें करणें भाग आहे व म्हणून तें आमच्या हातून होतें ' असें म्हणणारे लोक कधीं कधीं भेटतात, याचा शोध करून पहावा. व्यासांनीं वेदव्यवस्था, महाभारत, अनेक पुराणें ह्यांकरितां जे कष्ट केले ते स्वतःसाठीं केले नसते कारण स्वतःला त्यांना कांहीं नको होतें. अमर्याद परहित ही ईश्वराची परमसेवा स्वीकारली होती म्हणून अमर्याद कष्ट केले व अमर्याद लोकहित त्यांनीं करून ठेवलें आहे. आजच्या मनूंतील उदाहरण द्यावयाचें तर एकदां आनी बेझंट बाईविषयीं कर्नल आल्काट यांनीं लिहिलें आहे कीं " या बाईंना स्वतःचेंच हित पहावयाचें असतें तर त्या आज आत्मानात्मविचार करीत वनवासी होऊन खुशाल आनंदांत निमग्न होऊन राहिल्या असत्या; परंतु धर्मकार्य, लोकहित, गुरुसेवा पतकरल्यामुळें कशा रात्रंदिवस उद्योगरत होऊन आहेत त्या पहा. " हें सेवाश्रमाचें रहस्य, मुलांनो, आज शिकून ठेवा; पुढें उपयोगी पडेल.

आतां मनाची वृत्ति बदलली आहे, स्वतःकरितां उद्योग करण्यांत आनंद वाटत नाहीं, असें असेल तर आजच्या मनूंत सेवाश्रम पाळण्याचे प्रकार कसे असूं

शकतील याचीं कांहीं उदाहरणें घेऊन सांगतों. उद्योग करावयाचा, नव्हे उद्योग जास्त हौसेनें आणि पुष्कळ करावयाचा, आणि त्याचें फळही उत्पन्न करावयाचें, पण तें फळ जरूर असेलच तर थोडें ठेवून बाकी सर्व किंवा कांहीं न ठेवतां सर्व इष्टकार्याला किंवा उपयुक्त संस्थेला अर्पण करावयाचें हा सेवाश्रमाचा धर्म लक्षांत असूं द्या. येथें मन कसें आत्मसंतुष्ट व खरें वनवासी-वनाश्रमी-एकांतवासी असतें हें अनुभवाच्या खुणेशिवाय कळावयाचें नाहीं. तो अनुभव घेण्याचे कांहीं प्रकार असे सांगतां येतील—

(१) धर्मवान **शिवाजी महाराजांनीं** सर्व राज्य समर्थांना अर्पण केलें, व पुढें त्यांचें म्हणून चालविलें. राज्याचें सर्व उत्पन्न समर्थ मागते तरीही तें महाराजांनीं सज्जनगडावर नेऊन भरपाई केली असती. तसें न करतां समर्थांचा प्रसाद म्हणून त्यांनीं राज्य केलें व तें लोकहितासाठीं चांगलें केलें. ह्याला मी महाराजांचा सेवाश्रम म्हणतों.



(२) आज राष्ट्रीय सभेसारख्या राजकीय संस्था चालविण्यास आपलें उत्पन्न, आपला वेळ, आपली विद्या, तिकडे लावणारे सेवाश्रमवासी अनेक मिळतील तर त्या संस्थेचें तेज वाढेल. ती स्थापन करणारे **ए. ओ. ह्यूम साहेब** पेन्शन घेतल्यावर आपला पुष्कळ पैसा व वेळ व उद्योग सतत बारा वर्षें तिच्या प्रीत्यर्थ लावीत आले. तो त्यांचा सेवाश्रम होय.

(३) त्यांच्याच सारखे **तापसी दादाभाई नौरोजी** यांनीं हिंदुस्थान-देशहितासाठीं अविश्रांत श्रम केले आहेत. पोटाचा उद्योग थांबवून त्याहून शंभरपट मेहनत देशहितार्थ केली. हा सेवाश्रम; निरुद्योगिता हा सेवाश्रम नव्हे.

(४) भागवतांत **प्रियव्रत** राजाची कथा आहे. तो स्वतःसाठीं राज्य करीत असतां कंटाळून वनवासाला निघाला. तेव्हां ब्रम्हदेवांनीं येऊन त्याला बोध केला आणि खरा वनवास मनाचा पाहिजे, तूं राज्य कर पण आजपासून देवाचें म्हणून कर व फळ स्वतःला घेऊं नको, आम्हीही सर्व देय सगळें काम ईश्वरार्पण करीत आहों—**'सर्वे वहामो बलिमीश्वराय'**—तर तूंही तसेंच कर, असें सांगितलें तेव्हां

त्याला तें मान्य झालें व पुढें त्यानें ईश्वराचें म्हणून उत्तम राज्य करून परमगति प्राप्त करून घेतली. तो प्रियव्रताचा सेवाश्रम होय. पहा अशा माणसांना **स्वार्थ आळशी करतो,** व परमार्थ उद्योगाची नवी ईर्षा व उमेद आणून देतो. आजच्या मनूंत ही प्रियव्रताची कथा मुलांमुलींच्या शाळेंत व त्यांच्या हृदयमंदिरांतही सोन्याच्या अक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखी आहे. अशा माणसांविषयीं एक आधुनिक कवि म्हणतो ‘ वनिं वसो गृहिं वा नर तो मुनि. ’ प्रियव्रत हा सेवाश्रमवासी राजमुनि.

( ५ ) पंजाबांत एक **ब्यारिस्टर** आहेत. ते संसार न करतां आपल्या धंद्याचें सर्व उत्पन्न आर्यसमाजाच्या लोकोपयोगी संस्थांना देत आहेत. हा त्यांचा सेवाश्रम होय.

( ६ ) भावनगर कॉलेजाचे प्रिन्सिपाल शेट **जमशेटजी उनवाला एम. ए.** यांनीं कांहीं महिन्यांपूर्वी पेन्शन घेतलें. ते घरीं शक्ति असून स्वस्थ बसते तर त्याला मी सेवाश्रम म्हणालों **नसतों. ते आतां** काशी येथील सेंट्रल हिंदु कॉलेजांत प्रोफेसर होऊन पगार न घेतां विद्यादान करीत आहेत. हा शेटजींचा सेवाश्रम होय.

( ७ ) माझ्या ओळखीचे एक **वकिलीचा धंदा करणारे** विद्वान गृहस्थ आहेत. त्यांना मुलेंबाळें नाहींत, व आतां स्वतःला पैशाची गरज नाहीं इतके ते श्रीमंत आहेत. ते अजून कोर्टांत जा ये करतात. धंदा सोडला तर आपण लवकर मरूं असें त्यांस वाटतें म्हणून ते काम करीत आहेत, द्रव्य पाहिजे म्हणून नव्हे. आतां येथें पहा—त्यांना फळाची गरज नाहीं, उद्योग करण्याला शक्ति आहे, व काम करीत रहाण्याची त्यांच्या आरोग्याला गरज आहे. अशा जीवाला आमचा सेवाश्रमधर्म म्हणतो “ सज्जन हो, सहज आत्मयोग साधणार आहे तो कां टाकतां? जानेवारीच्या पहिल्या तारखेपासून असें व्रत घ्या कीं मी दरमहा दहा हजार रुपये मिळवीन पण एक पैही घरीं नेणार नाहीं. विहित स्वकर्माचें सगळें फळ दरमहा कोणत्या तरी लोकोपयोगी संस्थेला दान देईन. ” अशा निश्चयांत आत्मोन्नतीची मोठी शक्ति आहे. इतका धर्मवानपणा जेथें येईल तेथें आत्मयोग सहज लीलेनें साधेल. असें करतील तर त्या वकिलांचा तो सेवाश्रम होईल. आज मुलींच्या शाळेसारख्या द्रव्याच्या मदतीसाठीं पोरक्या व दीन होऊन पडलेल्या अनेक संस्था आहेत, व अशा जातीचा सेवाश्रम पतकरणें ज्यांस शक्य आहे असे महाभाग लोकही

निरनिराळ्या धंद्यांत बरेच आहेत. ते मनांत आणतील तर असा **जिवंत सेवाश्रम** पतकरून अनाथ संस्थांना सनाथ करूं शकतील. पण आत्मविद्येचा बोध त्यांना जागें करील तेव्हां हें होणार आहे. धर्मज्ञान आणि आत्मविद्या ह्यांचें परिशीलन जर लहानपणींच मुलें व मुली ह्यांना विद्याश्रमांत असतां चांगल्या गुरूकडून घडेल तर जरूर नसतांही एकदेशी अहंतेचें जड ओझें वाहणारे जीवप्रवासी थोडे तरी सावध होतील व जीवितहेतु सफळ करतील.

सूर्योदय झाला म्हणजे जसा सहज प्रकाश पडतो तसा अंतरात्मा विकास पावला म्हणजे माणूस मानवजातीला ‘ स्वजन ’ म्हणूं लागतो व त्या वेळीं त्याचें सेवाश्रमधर्माप्रमाणें स्वभावतःच आचरण होतें. मग अशा आचरणाला जुना उद्योग सोडलाच पाहिजे असें नाहीं. हा उदारधींचा सेवाश्रम कोणत्याही धंद्यांत शक्य आहे. माणूस व्यापारी असून सेवाश्रमी होईल, तसा दुसरा कोणताही धंदा करणारा माणूसही हा आश्रम यथासांग पाळूं शकेल. जुना धंदा बदलून नवीन काम सेवाश्रमांत केलें तरी चालेल; व अशाही ‘ सेवकांची ’ आज गरज आहे. अनेक संस्था आज अशा आहेत कीं त्या नीटपणें चालविण्यास माणसें नाहींत. तीं माणसें तृतीयाश्रमवासी **स्त्रीसेवक** व **पुरुषसेवक** निघाल्यावांचून मिळणें शक्य नाहीं. कांहीं दिवसांपूर्वीं धर्मकार्याविषयीं बोलणें निघालें असतां लोकमान्य रा० बळवंतरावजी टिळक म्हणाले ‘ कबूल, पण हें काम करावें कोणीं, माणसें कोठें आहेत ? ’ गोष्ट खरी आहे. माणसें नाहींत. कां नाहींत तर गृहाश्रमींचा गृहानुभवच संपत नाहीं म्हणून. स्वयंस्फूर्तीनें सेवाश्रमाची दीक्षा आम्ही घेऊं तरच अशीं लोककार्यतत्पर माणसें मिळतील. तर मुलांनो हा विचार मोठेपणीं तुम्ही अमलांत आणण्याचा आतांपासूनच निश्चय करून ठेवा. ज्ञानेश्वर सांगतात कीं आपलें पोट भरलें तरी अजून माणूसपणाचें कर्तव्य संपलें नाहीं. ते म्हणतात–‘ देखें प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले । तयांहीं कर्तव्य असे उरलें । लोकांलागीं ॥ ’ !

तृतीयाश्रमाचे म्हणून कांहीं आचार व गुण सांगितले आहेत त्यांचा हेतु असा आहे कीं अशी वृत्ति बनण्यास तेणेंकरून मदत व्हावी. मी घेईन, मी खाईन, मी सुखी होईन, मी धनवान होईन, मी मोठा होईन, ह्या वृत्तीला **भोगवृत्ति** म्हणतात; मी घटकाभर उपाशीं राहीन पण दुसऱ्याची भूक निववीन, दुसऱ्याला सुखी करीन, लोकांस सन्मार्गाला लावीन, ह्या वृत्तीला **त्यागवृत्ति**

किंवा दान म्हणतात. लहानपणापासून गाणेंबजावणें, ऐषआराम, पूजाअर्चा न करणें, धर्महीन जीवन, उत्पन्नाबाहेर बेहिशेबी खर्च, व व्यवहारनीतीच्या आणि संसारसुखाच्या खोट्या कल्पना, यांत दिवस गेले तर सेवाश्रमाचे धर्म कधींही आचरतां यावयाचे नाहींत व आत्मविकास व्हावयाचा नाहीं. त्याची तयारीच करावी लागते. विद्याश्रमांत चांगली विद्या मिळाली असली, गुरूनें सद्बोध केलेला असला, गृहाश्रमांत त्या शिक्षणाप्रमाणें प्रत्यक्ष वागण्याचा प्रयत्न केला, आणि सामान्यतः इंग्रजींत म्हणतात त्याप्रमाणें ' **साधी रहाणी मोठें मन** '* असे आपण राहूं, तरच पुढच्या आयुष्यांत आत्मविकास करणारें आचरण स्वाभाविकपणें करतां येईल. त्या तयारीला जे आचार व गुण सांगितले आहेत त्यांत देह आणि मन यांवर संस्कार व्हावा असा हेतु आहे. ते याप्रमाणें सांगतां येतील.

या तिसऱ्या आश्रमाचा देखील समारंभपूर्वक **विधि** व्हावा. आश्रमग्रहणाचा विधि करणें यांत मोठी शक्ति आहे. पहिल्या आश्रमाचा उपनयन, दुसऱ्याचा विवाहविधि, तसा तिसऱ्याचाही विधि झाला पाहिजे. विधीनें आपल्याला पुष्कळ मदत होते. त्याचे आपल्या सूक्ष्म देहावर संस्कार होतात व शक्ति तेथून येते. म्हणून मनु म्हणतो–'वने वसेत् तु नियतः '–नियम घेऊन, व्रत स्वीकारून, दीक्षा धारण करून, मग वनाश्रम पतकरावा. अनुक्रमानें घडणारे विधि माणसाला पुढें पुढें धीर करून जाण्यास मदत करीत असतात, व ते प्रसिद्धपणें झाले असल्यामुळें त्याला मनांत व जनांत बंधकारक होतात. अनियंत्रित अशा प्रबळ वासना हातीं येण्यास जसे नियम उपकारक होतात, तसे विधि हे दुर्बळ मनाला माघार घेण्यास प्रतिबंध करतात व मग तेंच मन हळू हळू नूतन अभ्यासाच्या रहाटीनें सबळ होतें. विधीमुळें माणसाला मागें जातां येत नाहीं. एकनाथ महाराज म्हणतात कीं पुढें जाण्यास विधि आहे, ' परी माघारें जावयासी विधि नाहीं. ' मनाचा निश्चय ढळूं लागला तर दीक्षाविधीचें स्मरण सावध करील व धीरानें व्रतपालन करण्यास प्रोत्साहन देईल, म्हणून सेवाश्रमाचा विधि व्हावा. त्याचप्रमाणें सेवाश्रमाचीं दर्शक म्हणून विशेष प्रकारचीं **वस्त्रें** असावीं. तीं आमच्या प्रिय ' सेव-

---

* Plain living and high thinking.

कांना ' आपल्या व्रताचें वारंवार स्मरण करून देतील हें एक; व दुसरें असें कीं त्यांच्या त्या विशिष्ट वस्त्रांकडे पाहून इतरांना बोध घेतां येईल, त्यांच्याशीं सामान्य प्राकृत जन आदबीनें वागतील, व सेवाश्रमधर्माचा मूर्तिमंत **अवतार** असा हा प्रत्येक स्त्रीपुरुषसेवक पाहून ह्या व्रताविषयीं जिज्ञासा वाढेल. केवळ लौकिक दृष्टीनें बोलावयाचें म्हणजे हा दीक्षाविधिप्रकार कोर्टांत आपण कोणतीही देवघेव **रजिस्टर** करतों त्यासारखाच आहे. सेवाश्रम पतकरण्याची ज्याला ताकद आली असेल त्यानें विचारपूर्वक आधीं निश्चय केल्यावर शुभं च शीघ्रं या न्यायानें तो विधिपूर्वक चारचौघांसमक्ष रजिस्टर करावा हें बरें.

विधि आणि व्रताचीं वस्त्रें इतकी मदत देहाला बाहेरून झाली; आतां देहाचे मांसरेणु बदलून नव्या व्रताला अनुकूल होतील असेंच **अन्नपान** सेवन करण्याची ' सेवकांनीं ' खबरदारी घेतली पाहिजे. ह्याविषयींच्या शास्त्रांच्या आज्ञा शिरसावंद्य मानून अनुभव घ्यावा हेंच बरें. अन्नपान असें सेवन करावें कीं त्यानें उन्माद यावयाचा नाहीं, वासना प्रज्वलित व्हावयाच्या नाहींत, व स्वार्थाचे विचार आणि ऐषआरामाचे विकार जागृत व्हावयाचे नाहींत. मनु म्हणतो कीं तृतीयाश्रमदीक्षितानें ' **मुनींचीं पवित्र अन्नें खावीं,** ' आणि सायंकाळीं पुन्हा स्नान करून उपासना करावी. अन्न थोडें खावें व मऊ बिछान्यावर निजूं नये. हे व असेच दुसरे नियम ऋषींनीं स्वानुभवानें लिहून ठेवले आहेत ते आदरानें पाळावे ह्यांतच आपलें कल्याण आहे. ह्याविषयीं कोणी चिकित्सा करूं लागल्यास मी त्याला इतकेंच म्हणेन कीं ' भल्या माणसा अनुभव तर घेऊन पहा आणि मग बोल. '

ही बहिरंगाची तयारी महत्त्वाची खरी, तरी ती अंतरंगाच्या तयारीशिवाय अगदीं पंगु होय. अंतरंगही तसेंच **यमनियमांनीं** मजबूत बनविलें पाहिजे. सेवाश्रमदीक्षितानें कोणते मानसिक गुण अंगीं वृद्धिंगत करण्याचा प्रयत्न करावा याविषयीं मनु म्हणतो—

**स्वाध्याये नित्ययुक्तः स्यात् दांतो मैत्रः समाहितः ।**
**दाता नित्यं अनादाता सर्वभूतानुकंपकः ॥**

नित्य स्वाध्याय करावा, म्हणजे आत्मविद्येच्या ग्रंथांचें रोज कांहीं वेळ वाचन व मनन करावें. **स्व-अध्याय,** स्वचा किंवा आत्म्याचा विकास करील असा

अभ्यास, केल्यानें जीवितहेतूची जागृति ठेवणारे विचार नेहमीं मनांत घोळत रहातात. रोज नियमितपणें व मननपूर्वक गीतादि ग्रंथ वाचणें म्हणजे व्यासा-सारख्यांच्या बुद्धीशीं आपला तितका वेळ योग करणें होय. ह्याचा मनावर श्रेष्ठ संस्कार होतो असा पुष्कळांचा अनुभव आहे. उन्नत विचार चिंतण्याची, आत्मानुभवी सज्जनांच्या बोधवचनांचें मनन करण्याची, मनाला संवय करणें हें आत्मविकासाचें उत्तम साधन सर्वांनीं आचरून पहावें. भक्तिपूर्वक स्तोत्रें म्हणणें, अध्यात्मग्रंथांचें पारायण करणें, ह्याचाही असाच परिणाम होतो. व्रता-चरणाला अनुकूल वृत्ति अखंड रहावी म्हणून एक दिवस सुद्धां अशा स्वाध्याया-वांचून जाऊं नये हें तत्त्व मनुवचनांत ' नित्य ' शब्दानें सुचविलें आहे.

**दान्त** म्हणजे सुखदुःख जयापजय सहन करणारा. कसाही प्रसंग आला तरी मनाची चलविचल होऊं न देणें ही मानसिक सामर्थ्याची एक परीक्षा आहे. तसेंच जीभ आंवरून कामापुरतेंच बोलावयाचें, व्यर्थ बडबड करावयाची नाहीं, हा नियमही आत्मसंयमन वाढवणारा आहे.

**मैत्र**, सर्वांवर भेदबुद्धि सोडून प्रेम करणारा. **समाहित**, समबुद्धि ठेवून वागणारा. सेवाश्रमांत ही मनाची भावना अत्यावश्यक आहे. ही भावना असेल तरच सेवाश्रम पतकरतां येईल; व पतकरल्यावर पुढें ती सर्वात्म-भावना वाढविणें ह्याशिवाय आतां योगासमीप येणाऱ्या जीवाला दुसरा उपाय नाहीं.

**नित्यदाता**, सदैव दानशील असणारा. त्यागबुद्धि हा दानबुद्धीचा पर्याय होय. परोपकार हा माझा धर्म, परोपकारासाठीं माझें जीवित, असें म्हणून सदैव दुसऱ्याच्या उपयोगीं पडणारा तो नित्यदाता. **अनादाता**, स्वतःकरितां कांहीं न घेणारा, स्वतःला कांहीं नको म्हणणारा. आणि इतकी मनाची वाढ झाली म्हणजे सहजच **सर्वभूतानुकंपकः**—सर्व भूतमात्रावर अनुकंपा करणारा. मुलांनो ही शारीरिक व मानसिक तयारी पुढच्या कामाची—योगाश्रमाची—उघड दिसते हें मीं सांगितल्याशिवाय तुम्हांला ओळखतां येईल.

असें वळण जेथें शरिराला आणि मनाला लागेल तेथें देहाहंभाव सुटेल व परहितबुद्धि वाढेल इतकेंच नव्हे तर खरोखर आत्मदशा कांहीं निराळी होईल. असा सेवाश्रमी पूर्णपणें **देशकुटुंबी** आणि कांहींसा **वसुधाकुटुंबी** होण्याच्या अधिकाराला येऊन पोहंचला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

अशी तयारी करून ' सेवक ' बनलेल्यानें शक्य असेल तेव्हां, घरीं बसून न रहातां, परोपकारार्थ जागजागीं व देशोदेशीं हिंडावें अशी शास्त्राची आज्ञा दिसते. शास्त्रांत अशाला **परिव्राजक** म्हणजे सर्वत्र फिरणारा म्हणतात. मला वाटतें आजच्या मनूंत सेवाश्रमी जो आहे तोच परिव्राजक होण्याला योग्य होय. परिभ्रमणाचा धर्म संन्यासापेक्षां सेवाश्रमालाच योग्य दिसतो. गृहाश्रमी घरांत राहून काम करीत होता, तर आतां परिभ्रामक सेवाश्रमी सर्वत्र फिरून आपलें मनुजसेवेचें काम करणार. दूरदेशीं जाऊं नये अशी शास्त्रांत एक आज्ञा आहे. होय, पण ती गृहाश्रमाला लागू आहे, सेवाश्रमाला नव्हे. ज्या गृह-स्थाला घरीं किंवा स्वदेशांत रहाणारा अशी शास्त्र पदवी देतें त्याला तें परदेशीं जाऊं देणार नाहीं हें म्हणणें सयुक्तिक दिसतें; पण ज्याला तें परि म्हणजे सर्वत्र पृथ्वीभर परिव्रजनाचें—संचार करण्याचें—काम सांगतें अशा परि-व्राजकाला तें परदेशगमन कसें करूं नको म्हणेल ? ज्या काळीं आगगाडी किंवा आगबोट नव्हती, ज्या काळीं खुशाली कळण्याला पाव आण्याचें पोस्ट आणि चार आण्यांचें तारायंत्र नव्हतें, ज्या काळीं राष्ट्राराष्ट्रांत उदारपणाचा सलोखा नव्हता, अशा काळीं गृहींनीं दूरदेशीं जाऊन आपला जीव धोक्यांत घालूं नये आणि कुटुंबपोषणाची हयगय करूं नये असें सांगणारें शास्त्र किती दूरदृष्टि असावें बरें ! हा शास्त्राचा मनोदय वस्तुस्थिति दर्शविणाऱ्या नांवावरूनच उघड होत आहे हें मीं नुकतेंच सुचविलें आहे. गृह-स्थ जो त्यानें घर किंवा देश सोडून जाऊं नये; पण पुढचा आश्रमी कसा तर त्यानें घरांत राहूं नये ! तो परिव्रा-जक, सर्वत्र भ्रमण करण्याचा स्वधर्म पाळणारा ! तर परदेशगमननिषेधक शास्त्र-वचनें जीं आहेत तीं केवळ गृहाश्रमाविषयीं आहेत असें मानणें मला बरेंच सयुक्तिक दिसतें.

सेवाश्रमी जो परिव्राजक त्यानें गांवोगांवीं आणि देशोदेशीं फिरून धर्मोपदेश करावा, परदेशांत लोकांना सनातनधर्म शिकवून तेथील कलाकौशल्य वगैरे जास्त विद्या स्वतः शिकून ती येत नसेल त्याला शिकवावी, म्हणजे सामान्यतः पूर्वदेशांतील धर्मज्ञान पश्चिमदेशांत शिकवून तिकडील लौकिकी विद्या इकडे आणावी, आणि व्यापक अर्थानें लोकशिक्षणाचें काम अंगावर घेऊन तें सतत चालू ठेवावें. ह्या कामाची आज गरज आहे व तें आधुनिक परिव्राजकांशिवाय दुसऱ्या कोणाला करतां यावयाचें नाहीं. गृहाश्रमाखेरीज बाकीचे आश्रम

निरुपयोगी असें कांहीं अज्ञजन प्रतिपादन करतात; पण तें बरोबर नाहीं. विद्या संपादन करणारा विद्याश्रम, जगाचा संसार चांगला चालावा म्हणून परोपकाराचीं कामें करणारा सेवाश्रम, आणि त्याहून श्रेष्ठ असें मनुष्यमात्राच्या आत्मोन्नतीचें ओझें शिरावर घेणारा योगाश्रम, हे तीन संरक्षक नसतील तर गृहाश्रम बिचारा एकटा घरांत राहून काय करील ! पण हें चौघांचें परस्परोपकारित्व लक्षांत येत नाहीं, म्हणून इतर आश्रमांची महती कमी मानण्यांत येते. खरा प्रकार तसा नाहीं हें प्रस्तुत विवेचनावरून कोणाच्याही लक्षांत येईल.

मुलांनो, तिसरा आश्रम किती व्यापक व मानवहितकारक आहे तें पाहिलें ना ? ऋषींनीं हे स्वाभाविक असलेले चार आश्रम सांगून त्यांचे गुणधर्म आपल्या सगळ्यांच्या हिताकरितां शिकवून ठेवले आहेत. ते विसरूं नका. मोठेपणीं तसें आचरण करण्याचा प्रसंग येईल तेव्हां हें शिक्षण उपयोगीं पडेल.

आतां शरिराचे श्रम कमी करण्याची वेळ आली. पण शरिराला विश्रांति दिली म्हणजे मनाला आणि आत्म्याला जास्त काम करण्यास तितकी मोकळीक मिळाली असें समजावयाचें. पुढें माणसाला जास्त काम मनानें आणि आत्म्यानें करावयाचें असतें, हें सांगण्यास व समजण्यास सोपें नाहीं तरी सांगवेल तितकें व समजेल तितकें पाहूं.

वियोग जाऊन जीवाचा देवाशीं योग व्हावा याचा अनुभव चौथ्या आश्रमांत आत्मप्रतीतीनें घ्यावयाचा. तो घेतांना श्रीकृष्ण म्हणतात ' कार्यं कर्म समाचर, ' जें कर्तव्य कर्म दिसेल तें अभेदभावानें सर्वकाळ समाचर–करीत रहा; त्याचें फळ परमेश्वर जाणे !

देवाच्या घरचें दिव्य प्रेम, देवाच्या घरची अभेदबुद्धि, देवाच्या घरचा सर्वात्मभाव, पृथ्वीवर प्रत्यक्ष आणून दाखविणारा तो पुण्यवान योगाश्रम स्वरूपानें कसा आहे तें आतां पाहूं.

## ८. योगाश्रमाचे धर्म.

विद्या, उद्योग, परोपकार, आत्मानुभव, अशीं चार कामें साधण्याचे चार आश्रम होत. येथपर्यंत आपण तीन आश्रमांचा विचार केला. पहिल्यांत विद्या संपादन केली, दुसऱ्यांत उद्योग केला, तिसऱ्यांत परोपकार साधला; आतां आत्मानुभवाचा प्रसंग आला आहे. पहिल्या तिहींमध्यें आत्मानुभव

नव्हता असें नाहीं. आत्मानुभवासाठींच तर ते तीन आश्रम 'आश्रम' म्हणून पाळले. पण आतां तो आत्मानुभव विशेष रीतीनें प्रगट होण्याचा समय आला आहे.

योगाश्रम हा पूर्वीचा संन्यास. त्याची व्याख्या 'काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः' अशी दिली आहे. काम्य कर्मांचा त्याग तो संन्यास असें कवि म्हणजे ज्ञाते सांगतात. स्वार्थासाठीं काम करावयाचें ज्यानें पूर्णपणें सोडलें तो संन्यासी होय. कोणतेंही कर्तव्य जें आतां करावें लागेल तें कर्तव्य म्हणून करावयाचें, तें देवाचें आणि जगाच्या हिताचें आहे म्हणून करावयाचें, असा कोणीही माणूस सामान्यतः संन्यासधर्म आचरीत आहे असें होईल.

पण ही मनाची भावना म्हणजे कर्तव्याशीं आणि जगाशीं केलेला योग होय. म्हणून मीं याला योगाश्रम हें नांव दिलें आहे. माझा आत्मा सर्वत्र आहे, विश्व आणि विश्वात्मा ह्यांहून मी निराळा नाहीं, आतां मला वैरी–परका–पर म्हणून कोणी नाहीं, ही भावना योगाची साक्ष देणारी आहे. यालाच सर्वात्मभाव म्हणतात व हेंच आत्मानुभवाचें स्वरूप होय.

आधीं जीव धर्माचा अंगीकार करून कुटुंबकुटुंबी होऊं लागला ती योगाची किंवा आत्मानुभवाची पहिली पायरी. पुढें तो देशकुटुंबी आणि वसुधाकुटुंबी अशा पायऱ्यांवरून क्रमाक्रमानें चढून जाऊन, आतां पूर्णपणें वसुधाकुटुंबी आणि साधेल तितका विश्वकुटुंबी होण्याचा प्रयत्न करणार. अजून योगदशा त्याला प्राप्त करून घ्यावयाची आहे व त्या प्राप्तीसाठीं तत्सजातीय प्रयत्न केल्याविना गत्यंतर नाहीं. पहा, योगाश्रम हा सेवाश्रमाप्रमाणें निवृत्तीचा आश्रम म्हटला आहे, तरी तेथें प्रयत्न थांबला नाहीं बरें. कुटुंब आणि मी एक हा योग साधण्याचा पहिला प्रयत्न, स्वदेश आणि मी एक ही 'सर्वदेशी' अहंता अंगी आणण्याचा दुसरा प्रयत्न, वसुधातलावरील मानवजाति आणि मी एक हा अभेदभाव अनुभवण्याचा तिसरा प्रयत्न, आणि अखिल विश्व आणि मी भिन्न नाहींत असा सर्वात्मभाव साधण्याचा चौथा प्रयत्न. असा जीवयोगाचा प्रयत्न माणूस कधीं स्वेच्छेनें तर कधीं नियमबद्ध व प्रसंगवश होऊन करीत असतो.

विश्वकुटुंबित्व किंवा वसुधाकुटुंबित्व हा आदर्शविचार पुढें कित्त्यासारखा जो ठेवीत असेल तो स्वदेशाला विसरतो किंवा स्वकुटुंबाला टाकतो किंवा इष्टमित्र

सोडतो असें कोणी म्हणेल तर तें अज्ञानमूलक आहे म्हणून समजावें. व्यापक विचार हा आत्म्याचा किंवा मनाचा धर्म आहे, देहाचा नव्हे. देहानें माणूस विश्वांत किंवा पृथ्वींत रहात नाहीं; देहानें तो स्वदेशांतच आणि स्वकुटुंबांतच असतो. ज्याचा आत्मा विस्तार पावला, ज्याचें मन सागरासारखें थोर झालें, तो घरादाराची आणि इष्टमित्रांची किंवा स्वदेशाची आस्था सोडील हें म्हणणें एकदेशीय होय. उलट, ज्याचें मन मर्यादित तो स्वदेशभक्तही तितक्याच किंमतीचा असणार. ज्याचें मन संकुचित तो कुटुंबांत आणि इष्टमित्रांत प्रेमानें तितकाच वागणार. पण एकदां माणसाच्या मनाचा गुणधर्म बदलूं द्या, तें एकदां उदार होऊं द्या, म्हणजे तो कुटुंब आणि देश ह्यांची सेवा खरी करील, सर्व देशबांधवांना एकसारखे स्वजन मानील,—कीर्तीसाठीं किंवा स्वार्थासाठीं देशसेवेचा केवळ आव घालणार नाहीं.

व्यास, वाल्मीकि, शंकराचार्य, तुकाराम, ह्यांनीं पृथ्वीतलावरील मनुष्यमात्राला ज्ञान देणारे विचार सांगितले म्हणून त्यांनीं स्वदेश बुडविला काय ? धर्मसंस्थापक हे उदारात्मे होते आणि त्यांनीं उदार धर्मतत्त्वें शिकविलीं, म्हणून ते आणि त्यांचे उदार धर्मविचार त्या त्या राष्ट्राच्या उपयोगीं पडले नाहींत काय ? उलट जे ' आमचा धर्म, आमचा देश, ' असें वरवर बोलून मन चार भिंतींच्या आंत कोंडून ठेवते झाले त्यांच्या मनाचा संकुचित स्वार्थधर्म सुटला नसल्यामुळें ते ' स्वहित कीं परहित ' असा निवड करण्याचा प्रसंग आला तेव्हां मित्राशीं कुटुंबाशीं किंवा देशाशीं कृतघ्नपणा करण्यास चुकले नाहींत.

तर योगाश्रमांतील योग, आत्मानुभव, सर्वात्मभाव, विश्वकुटुंबित्वाची उच्च भावना, हिचा स्वदेश आणि स्वजन ह्यांच्या हिताशीं विरोध नसून उलट ती त्याला सर्वथैव उपकारकच आहे.

हा विचार न विसरतां, आतां मी योगाश्रम कशाला म्हणतों तें पाहूं.

जीव हा वियोगापासून योगाकडे चालला आहे. आतां चौथ्या आश्रमांत तो योग साधणार. आणि त्याच्यांत योगसिद्धि होत आहे याला प्रमाण काय तर तो मनुष्यमात्राला आणि भूतमात्राला स्वजन समजतो, आत्मवत् मानतो, आणि तसें सर्वदा आचरण करतो. असा जो तो योगी किंवा मुक्त. मनु म्हणतो ' समता चैव सर्वस्मिन् एतन्मुक्तस्य लक्षणं. ' **शिवाजी महाराज** शत्रूच्या स्त्रियांना आईसारख्या मानीत आणि कुराणशास्त्र हातीं लागलें तर त्याला

धर्मग्रंथ म्हणून गीतेप्रमाणेंच वंद्य मानून मुसलमानांकडे आदरपूर्वक पाठवून देत. या मनाच्या भावनेला समता म्हणतात. योगयुक्त मनाचें हें स्वरूप प्रत्यक्ष रोजच्या आचरणांत पहावयाचें असतें. तर सर्वांशीं समतेनें वागणारा, सर्वांच्या कल्याणांत तत्पर असलेला, ' सर्वभूतहिते रतः '–सर्व भूतमात्राच्या हितीं रत–असा जो तो माझा योगाश्रमी.

आतां मोठा जड प्रश्न असा उद्भवतो–' अहो हें कसें ? शरीर सशक्त होतें तेव्हां कर्तव्याची मर्यादा कांहींशी स्वाधीनची तरी होती, पण आतां शरीर श्रांत झालें–दमलें–त्या वेळीं कर्तव्य विश्वव्यापक करतां तर अशी माणसाला शक्ति आहे काय ? शरीर काम करूं शकत नाहीं अशा वेळीं माणसानें कसें काम करावें कीं त्याला विश्वहित साधतां येईल ? '

मुलांनो ही शंका तुम्हांला समजली ना ? शंका अशी आहे कीं शरीरसामर्थ्य कमी झालें असतां अशक्य वाटणारें काम तुम्ही योगाश्रम्याला कसें व कोणतें सांगतां आणि त्यानें तें कसें करावें ?

मनुष्य जर केवळ शरीर असता, ' कर्म ' म्हणून जें तें केवळ जडदेहानेंच होत असतें असा प्रकार असता, किंवा जडदेहानें होणारें चळवळीचें व याता-यातीचें काम कमी केलें असतां दुसरें कांहीं शांतपणानें करावयाचें लोकहिताचें कामच नाहीं असा प्रकार असता, तर मात्र ही शंका अगदीं निरुत्तर होती. पण खरा प्रकार कांहीं निराळा आहे. तो जसा आहे म्हणून ज्ञाते सांगतात तसा सिद्धांतरूपानें सांगतों.

मनुष्य हा केवळ जडदेह नव्हे. जडदेहांत जो रहातो तो ' देही ' मनुष्य. त्याला मन किंवा आत्मा म्हणूं. लौकिकांत व्यक्त होण्यास मनाला किंवा आत्म्याला जडदेहाची गरज आहे ही गोष्ट खरी तरी मन किंवा आत्मा हीं दुसऱ्या सूक्ष्मदेहांत रहातात व त्यांत राहून त्यांना जडदेहाची अपेक्षा न करतां स्वतंत्रपणें काम करतां येतें. मनुष्य जडदेह सोडून तीन प्रसंगीं जातो, एक **ध्यानांत**, दुसरा **झोंपेंत**, व तिसरा **मरणांत**. मरणांत तो जातो आणि परत येत नाहीं. ध्यानांत आणि झोंपेंत बाहेर गेलेला परत येतो. ध्यानांत ह्या जा-येची जाणीव तुटत नाहीं, झोंपेंत बहुतेकांची तुटते कांहींची तुटत नाहीं. जाणीव कायम रहाणें ही एक योगावस्था होय. येथपर्यंतचे आयुष्याचे दिवस

ज्यानें सदाचरणांत व धर्मवानपणांत घालविले असतील त्याला ही जोड थोड्या आयासानें जोडतां येईल.

योगाश्रमांत जनहिताचें काम विशेषेंकरून आत्म्यानेंच करावयाचें असतें. या कामाला जडदेह अगदीं शांत राखावा लागतो. जितका तो जास्त शांत तितकें जास्त काम मन आणि आत्मा ह्यांना आपापल्या भूमिकेवर करतां येतें, व त्याची जगाच्या उन्नतीला मोठी मदत होते. **शांताश्रमाचें** हें अपार वैभव समजणें व समजून घेणें हा आत्मविद्येचा विषय आहे. ज्या वयांत जडदेहाला यातायातीचें काम होत नाहीं, ज्या वयांत शांत रहाण्यांत त्याचें हित आहे, त्या वयांत 'तूं शांत राहूं नको' असें ऋषींचा धर्म त्याला सांगत नाहीं. 'तूं आतां शांतच रहा व तुझ्या शांत रहाण्यानें जें आमचें काम होणार आहे तें आतां आम्ही करून घेतों' असा सामोपचाराचा विनियोग ऋषींनीं सांगितला आहे. जडसृष्टि आणि सूक्ष्मसृष्टि, रूपलोक आणि जीवलोक, ह्यांचे अबाधित चालणारे नियम प्रत्यक्ष पाहून धर्म सांगण्यांत आला म्हणून तो सनातन, नित्य, शाश्वत ! तर जडदेह शांत राखला असतां मन आणि आत्मा पुष्कळ काम करतात. सूक्ष्मदेह जो आहे तो कधीं निजत नाहीं कीं दमत नाहीं. त्या देहांत–त्या उपाधींत–वावरणाऱ्या मनानें आणि आत्म्यानें माणूस असंख्य पटीनें श्रेष्ठ असें जगाच्या आणि जनतेच्या उन्नतीला मदत करणारें काम करीत असतो. तो रात्रीं देखील जडदेहाबाहेर जाऊन ज्ञान घेतो देतो व अनेक प्रकारें परोपकार करतो, आणि दिवसा देह शांत ठेवून मनानें आणि आत्म्यानें जगाच्या उन्नतीला उपकारक असा क्रियाशक्तिसंपन्न 'उद्योग' करूं शकतो. पण माणसाला हें सामर्थ्य उतार वयाबरोबर आपोआप येत नाहीं. पहिल्या तीन प्रकारच्या आश्रमधर्मांत सूचित केलेलें आचरण जर हातून घडलें नसेल, तसे गुण जर अंगीं आले नसतील, आत्मबुद्धि-मनोरूप जो जीव त्यानें जर आपला निराळेपणा ओळखला नसेल, देहाला जर जीवानें आपल्या हुकमानें 'सेवाधर्म' लावून दिला नसेल, तर त्याचा अर्थ असा कीं जीवाचा देहभावांत लय झाला आहे. अशा स्थितींत उतार वय जरी झालें तरी जीवपणाचें काम करायला जीव जागृत आहे कोठें ? तो तर येथपर्यंतच्या धर्महीन आणि आत्महीन अशा अभागी जीवनांत मनुष्यानें दिवस घालविले असल्यामुळें देहांत मुरून गेला आहे. हा देहमग्नभाव म्हणजे आत्म्याचें मरण

होय. अशीं माणसें आत्मविद्येंत मेलेलीं गणलीं आहेत. म्हणून एके उपनिषदांत म्हटलें आहे ' ते वै आत्महनो जना:'–असे जन देहानें जिवंत पण आत्म्यानें खरोखरच मेलेले ! त्यांनींच बहुतेक भूलोक भरलेला आहे म्हणून तो ' मृत्युलोक. ' मग मेलेल्यांना काय योग साधेल ! तर मी ज्या योगावस्थेंतील कार्यासंबंधानें बोलत आहें तें ज्यांनीं आत्मा धर्मवानपणानें वागून जिवंत ठेवला असेल किंवा जीवमान केला असेल त्यांचें काम आहे.

मुलांनो हा विषय थोडा अलौकिक दिसेल, आणि तो खरोखर अलौकिकच आहे बरें ! तरी ऐकून ठेवण्यासारखा आहे हें मी अनुभवानें सांगतों. त्याचा बोध मनन केल्यानें होणारा आहे, म्हणून त्याविषयीं मनु म्हणतो—

**ध्यानिकं सर्वमेवैतद् यदेतद् अभिशब्दितं ।**

( ६.८२ ) म्हणजे हें जें कांहीं शब्दांनीं सांगितलें तें ध्यानानेंच प्रत्ययाला येईल. तर योगाश्रम हा प्राधान्येंकरून ध्यानमार्गाचा आश्रम होय.

ध्यानमार्गांत प्रधान कल्पना **गुरूच्या** आश्रयाची आहे म्हणून तो **गुरुमार्ग** म्हटला आहे. येथें पहिल्या आश्रमासारखा थोडासा प्रकार आहे. विद्याश्रमांत बटूचा मार्गदर्शक जसा गुरु तसा योगाश्रमांतील बटूचाही मार्गदर्शक गुरु असतो. पहिला **विद्यागुरु,** दुसरा अगदीं निराळ्या योग्यतेचा **आत्मगुरु** किंवा **गुरुदेव** होय. अंगीं गुण आणावे, शुद्धभावानें कर्तव्यें करावीं, म्हणजे योग्य वेळीं आपले जे आत्मगुरु असतील ते मग आपण न शोधतां भेटतील किंवा त्यांचे कोणी शिष्य भेटून ते गुरुमार्गाची वाट दाखवितील–हात धरून वाटेला लावतील. अशा प्रतीतीची साक्ष हृदयाशिवाय कोठें पटणार नाहीं व पटूं नये. म्हणून ज्ञानेश्वर म्हणतात ' सद्गुरु प्रगटतील हृदयामाजीं ' ! **हें खरें उपनयन**! पहा मुलांनो चार आश्रमांच्या आरंभीं उपनयन आणि चार आश्रमांच्या शेवटींही उपनयन. दुसरें सत्स्वरूप, पहिलें त्याची प्रतिमा. तर, योगाश्रमांत शरीर शांत ठेवून जें मनानें आणि आत्म्यानें काम करावयाचें तें ध्यानमार्गांतील पद्धतीनें आणि गुरुसंप्रदायाच्या व्रतानुसार करावयाचें हें कोणासही ह्या विवेचनावरून समजण्यासारखें आहे.

आजच्या मनूंत **ध्यानमार्ग** आणि **गुरुसंप्रदाय** यांची ओळख होणें सर्वांसच साधेल असें नाहीं. तर त्यांच्या अभावीं ज्यांना परोपकारार्थ योगा-

श्रमाची दीक्षा घ्यावीशी वाटेल त्यांनीं लोकहिताचीं कोणतीं कामें करण्यासारखीं आहेत तीं पाहूं.

धर्म, विद्या, सृष्टिशास्त्रशोध, तरुणांस बोध, दुःखितांचें सांत्वन, इत्यादि कामें लोकहिताचीं असून महत्त्वाचीं आहेत. धर्मांत दोन प्रकारचें काम आहे, अनुमानाचें आणि अनुभवाचें. त्या दोन्ही प्रकारच्या कामाला शांतपणाचा व्यासंग लागतो तो योगाश्रमांत करतां येईल. शिवाय उपासना, प्रार्थना, ह्यांचाही सूक्ष्म असा हितकारक परिणाम होतो म्हणून त्या धर्माचरणास आणि तद्वारा धर्मसंस्था थोडी तरी जागृत ठेवण्यास योगाश्रम उपयोगीं पडेल. तसेंच भारतादि ग्रंथ बारकाईनें वाचून त्यांतील सिद्धांत इतरांस सांगणें हें महत्त्वाचें कामही या आश्रमांत साधण्यासारखें आहे. विद्येचा कोणताही विषय आवडीचा असेल तो अभ्यासानें वाढवीत बसल्यानें योगाश्रम स्वतःला ज्ञानदायक आणि इतरांस हितावह होईल. तसेंच अनुभवानें खरा हितबोध तरुणांस करणारे योगाश्रमी समाजाचे संरक्षकच समजले पाहिजेत. याप्रमाणें, मनानें आणि आत्म्यानें काम करण्याचें साधलें नाहीं तरी, शांताश्रमांत लोकहिताचीं आणि ज्ञानाचीं अनेक कामें करतां येतील, तीं ज्याचीं त्यानें यथाशक्ति पाहून घ्यावीं. असे सच्छील लोक संसारी माणसांचा मोठा आधार होत. ते एके प्रकारें आम्हांला देवाच्या ठिकाणीं असून त्यांस '**भूदेव**'—पृथ्वीवरचे देव—देवासारखे आमचे निरपेक्ष हितकर्ते—म्हणण्यास हरकत नाहीं.

इतर आश्रमांप्रमाणें योगाश्रमाचाही विधि आहे व असावा. संन्यासदीक्षेचा विधि तोच योगाश्रमदीक्षेचा विधि होऊं शकेल. त्याचींही निराळीं वस्त्रचिन्हें असावीं; व तीं तशीं असल्यापासून कार्य कोणतें घडतें याचा विचार सेवाश्रमाच्या वेळीं झालेलाच आहे. असे ज्ञानी आणि निरपेक्ष कार्यकर्ते योगाश्रमी स्त्रीपुरुष जर समाजांत वावरूं लागले तर लोकसमाजाला एके प्रकारचा उदात्तपणा प्राप्त होईल यांत शंका नाहीं.

ह्या बाहेरच्या उपचारांशिवाय योगाश्रमाचे दुसरेही कांहीं नियम व आचार महत्त्वाचे असून ते मनूनें सांगितले आहेत. अन्न साधें असून तें थोडें आणि एक वेळ खावें. स्नान तीन वेळ आणि ध्यानउपासनाही तीन वेळ करावी. विवेक, वैराग्य इत्यादि मनोवृत्तींचा विचार करून तशी मनोवृत्ति प्रत्यक्ष साधण्याचा प्रयत्न करावा. श्रुतिवचनें, ऋषींचीं महावाक्यें, गीतेचा एकेक श्लोक,

ह्यांचें मनन करून तीं लिहितांना ऋषींची संवेदना ज्या भूमिकेवर होती त्या भूमिकेवर आपली संवेदना नेऊन काय बोध होतो तो पहावा. धर्माचा अनुभव सत्य आहे, किंवा धर्माचे बोल खरे आहेत, हें स्वानुभवानें सांगणारीं माणसें जर असलीं तर ऋषींच्या धर्माचा मान व आदर वाढल्यावांचून रहाणार नाहीं. हें मानवहिताचें काम विद्वान पुरुषांनीं व ज्ञात्या स्त्रियांनीं उतार वयांत योगाश्रमी होऊन न करावें तर दुसरें कोण करील बरें ? आणि अशा कामांत मन गुंतलें असतां त्यांचाही काळ दिव्यानंदांत जाऊन वृद्धापकालाचे दिवस कंटाळवाणे होणार नाहींत. इतकेंच नव्हे तर अशा आचरणाचा आणि आत्मचिंतनाचा मरणकाळच्या व मरणोत्तर स्थितीवर प्रत्यक्ष परिणाम घडत असतो. दुसरा **भुवर्लोक** व तिसरा **स्वर्लोक** येथें जीं जीवभावावर कार्यें घडत असतात व जीं कार्यें स्वभावरूपानें बरोबर घेऊन तो जीव पुन्हा प्रवृत्तिमय जगांत नवा जन्म घेऊन येणार त्या कार्यांचें रूपांतर घडवून आणण्यास बरीच मदत ह्या योगाश्रमापासून होणारी आहे. म्हणजे पहा, एका जन्मांतील निवर्तनमय प्रयत्न हा पुढल्या जन्मांतील प्रवर्तनमय प्रयत्नाशीं संबद्ध असून, सर्व प्रयत्न हे जीवाच्या उत्क्रांतीचे साह्यकर्ते होत. म्हणून मी आपल्याला पुन्हा सांगतों कीं ऋषींच्या धर्मांत ज्ञान भरलें आहे आणि तें तुम्ही मोठेपणीं चांगलें विचार करून पहा आणि त्याप्रमाणें वागा—तुमचें कल्याण होईल.

**मौन** हा एक महत्त्वाचा गुण या आश्रमांत विशेष आहे. देहाचें, वाणीचें, आणि मनाचेंही * मौन जितकें साधेल तितका आत्मा अधिक कार्यक्षम होईल. उपाधींचें मौन साधलें म्हणजे दिव्य अशा अंतरात्म्याला आपलें सामर्थ्य—तेज—ज्ञान—त्या उपाधींच्या द्वारें प्रगट करण्यास अगदीं मोकळी वाट मिळाली असें समजावयाचें. वर्गांत मुलें गडबड न करतां स्वस्थ चित्त देत राहिलीं तर गुरूचें बोलणें सर्वांस ऐकूं जातें व त्याला थोड्या श्रमानें पुष्कळ विद्या शिकवितां येते तसाच हा प्रकार आहे. अगदीं कामापुरतें आणि तेंही संयमयुक्त बोलणें हा गुण ह्या आश्रमांत मोठा मानला पाहिजे. हा संयम साधण्यासाठीं कांहीं चतुर्थाश्रमी साधकांनीं तर कित्येक दिवस मुद्दाम व्रत पतकरून भाषण

* गीता १७. १४–१९ यांत शारीर, वाङ्मय, व मानस असें तप वर्णिलें आहे, व तें उत्तम, मध्यम, अधम कशानें होतें तें सांगितलें आहे, तें सर्व प्रस्तुत विचारासंबंधानें वाचून पहाण्यासारखें आहे.

वर्ज केल्याचीं उदाहरणें आहेत. विशिष्ट अनुभवासाठीं जसा ह्या आश्रमांत कांहीं वेळ एकांतवास पतकरावा लागतो तसें मौनव्रतही कांहीं वेळ साधकावस्थेंत पाळावें लागतें. अशा साधकाचें एक ग्रीस देशांतलें उदाहरण सांगतों.

धर्मविषयाचा जीव जशी आत्मविद्या, तसा धर्मानुभवाचा जिव्हाळा ध्यानमार्ग होय. ध्यानमार्गाचा आधार असेल तरच माणसें धर्मवान होतील. असें कमी अधिक प्रमाणानें सर्व देशांत व सर्व काळीं घडून आलें आहे व घडून येत आहे. आर्यावर्तात गौतममुनीनें–ज्याला पुढें लोक ज्ञानी अर्थानें बुद्धपदवी देते झाले त्यानें–एकदां ध्यानमार्ग उघडा केला होता. त्या वेळीं यूरोपांतील देशां-तूनही अनेक साधकजन इकडे येऊन त्याचें शिष्यत्व पतकरीत. असा एक शिष्य **पिथागोरस** होता. तो गौतमगुरूच्या आज्ञेनें ग्रीसदेशीं परत जाऊन तेथें



एक संप्रदाय स्थापन करता झाला. त्याचीं गोड फळें उत्तम गुणवान स्त्रीपुरुषांच्या रूपानें ग्रीसदेशाला मिळालीं व त्या स्त्रीपुरुषांनीं ग्रीसच्या इतिहासाला शोभविलें आहे. तर, गौतममुनीचा जसा पिथागोरस तसा पिथागो-रसचा एक आपोलोनियस नामें मुनिव्रत असा सच्छिष्य होऊन गेला. तो योगाश्रमी असतां आश्रमधर्म फार जपून व आदरानें पाळीत असे. तो दोन वेळ स्नान करी; ध्यानउपासना तीन वेळ करी; शुद्ध व थोडें अन्न सेवन करी; गुरुवचनांचें निरंतर ध्यान करी, आणि पायांत जोडाही घालीत नसे. तो परिव्राजक होऊन धर्मोपदेशासाठीं सर्वत्र संचार करी आणि अहोरात्र स्वाध्यायमग्न असे.

मुलांनो अशा त्या आपोलोनियसमुनीनें एकदां आपली सर्व मिळकत गरिबांस वाटून टाकली आणि धनावर तुळशीपत्र ठेवून पांच वर्षे बोलावयाचें नाहीं अशा कठोर तपाची प्रतिज्ञा घेतली. प्रतिज्ञा घेतली आणि ती पाळली, ती कथा मोठी रमणीय आहे. त्यांतील एक प्रसंग सांगतों. एकदां निंदक लोक आमच्या ह्या मुनीची निर्भर्त्सना करूं लागले, आणि उच्चारवत नाहींत असे त्यावर दुराचरणाचे आरोप करूं लागले. त्या वेळीं 'आक्रुष्टः कुशलं वदेत्'–निंदकाला

आशीर्वाद द्यावा व त्याचें अभीष्ट चिंतावें–ह्या मनुवचनांतर्गत आज्ञेचा भंग होण्याची वेळ आली. आणि आतां व्रतभंग होणार, जीभ रागाचे शब्द उच्चारणार, इतक्यांत व्रताची आठवण कोणी तरी केल्यासारखें होऊन तो मुनि सावध राहिला आणि आपल्या चित्ताला धीर देऊन आपल्याशींच म्हणाला—

**मना शांत होईं जिभे स्वस्थ राहीं । †**
**मुनीच्या व्रताचा पहा भंग होई ॥.**

असा विवेक करून तो वेळोवेळीं सावध राहिला आणि गुरुकृपेनें तें त्याचें तप सिद्धीस गेलें.

व्रतधारण आणि व्रताचरण ह्याचा महिमा मोठा आहे. त्याचा विचार तुम्हांला मोठेपणीं फार उपयोगीं पडेल. आतां शिकून ठेवा म्हणजे पुरे.

तर योगाश्रमाचे देखील आचार आहेत व ते पाळणें इष्टहेतुसाधनाला महत्त्वाचें आहे. पण विसरूं नका बरें कीं आचारापेक्षां विचार मुख्य आहे, बाह्य रूपापेक्षां मनाची वृत्ति महत्त्वाची आहे. योगाश्रमाची महती बाहेरच्या चिन्हांवर अवलंबून नाहीं, ती समताबुद्धि आणि अभेदभाव यांवर अवलंबून आहे. म्हणून मनु म्हणतो—

**समः सर्वेषु भूतेषु न लिंगं धर्मकारणं ।**

'सर्व भूतमात्राविषयीं समबुद्धि हा धर्म, बाहेरील चिन्ह हें धर्मांचें प्रमाण नव्हे' ( ६. ६६ ). तसेंच आणखी मनु म्हणतो कीं **त्रिदंडी** कोण तर ज्याला वाग्दंड, मनोदंड, व कायदंड साधले तो म्हणजे जो वाचा, मन, देह हीं स्वाधीन ठेवण्यास शिकला तो,–केवळ तीन दंड धारण केल्यानें कोणी त्रिदंडी होत नाहीं. ( मनु० १२. १० ). येथेंही तोच भाव दिसून येतो.

याप्रमाणें वागत असतां, योगाश्रमी होऊन निरपेक्ष बुद्धीनें लोकहित साधीत असतां, एक दिवस सद्गुरूंचें प्रत्यक्ष दर्शन होईल आणि ते परमकरुणामय गुरुदेव आत्मानुभव–काय म्हणूं, देतील कीं सांगतील कीं काय करतील, मला सांगतां येत नाहीं ! इतकें मात्र खचीत कीं मग लोकहिताचें काम जें पडेल तें त्यांचें म्हणून करावयाचें, आपलें कांहीं नाहीं. मग दिवसा जडदेहानें त्यांचें

† Heart patient be, and thou my tongue be still.

काम आणि रात्रीं सूक्ष्मदेहानेंही त्यांचेंच काम. सारांश मग ते करतील ती आज्ञा आणि ते सांगतील तें काम !

ही योगाश्रमाची परमावधि. जीवाचें वियोगदुःख लयास गेलें. त्याला योगानंद मिळाला असें आतां म्हणतां येईल, पण त्या आनंदाचें स्वरूप शब्दांनीं सांगतां येणार नाहीं. ज्ञानेश्वर म्हणतात ' कसें बोटानें दाखवूं तुला । पहा अनुभव गुरुच्या मुला ॥'–अति नम्र असें शिष्यत्व पतकरून अनुभव घेऊन पहा; कळेल. आपण तो विचार ध्यानांत ठेवूं आणि जीवाला योग-मंदिराच्या अंतर्गृहांत सोडून ' आश्रम आणि आश्रमधर्म ' ह्याचा मुख्य भाग पुरा करूं.

## ९. आश्रमधर्मांची आजची दशा.

प्रस्तुत चार आश्रम सांप्रत काळीं कसे पाळले जातात याचा विचार निघाला असतां, आजच्या लोकस्थितीकडे वरवर पहाणारा म्हणेल कीं आज एक आश्रम बहुतेक पाळला जातो. जन्मल्यापासून मरेपर्यंत गृहाश्रम लोक पाळतात असें तो म्हणेल. पण मला वाटतें गृहाश्रम देखील बोधपूर्वक ' आश्रम ' म्हणून पाळला जात नाहीं. कशीं तरी मुलांमुलींचीं लग्नें होतात, आणि जन्मभर लोक कांहीं एका संसारांत गुंतलेले असतात, इतकेंच म्हणतां येईल. धर्माचें व्यापक शिक्षण लहानपणीं मिळत नाहीं, व ज्ञानमय मनोभावानें गृहधर्म आचरले जात नाहींत, म्हणून पुढच्या आश्रमांसाठीं जरूर लागणाऱ्या गुणांचा स्त्री-पुरुषांच्या अंगीं मुळीं उदयच होत नाहीं. चांगलें धर्मशिक्षण मिळून जर गृहधर्म आचरण्यांत येत असते तर त्याचीं मनोरम फळें उदार वृत्तीच्या रूपानें प्रगट झाल्यावांचून राहिलीं नसतीं.

आज जिकडे पहावें तिकडे असें दिसतें कीं लहानपणापासून, अगदीं एकलकोंडेपणानें आणि संकुचित सुखानें भरलेला संसार हाच काय तो जीवितहेतु, असें वळण मनाला लागत असतें. सर्वदा संसारसुखाचा विचार, सर्वदा संसार-सुखाचा नाद, सर्वदा संसारसुखाचा जप, ही आजची आश्रमधर्मांची कहाणी होय. यांत कोठेंही अविनाशी पण जीवभावाप्रत आलेला **आत्मा आणि त्याची गति** याची जागृति असलेली दिसत नाहीं.

लहानपणीं मुलांच्या समक्ष वडील माणसांचे सर्व सांसारिक खेळ चाललेले असतात, इतकेंच नव्हे तर बाहुल्यांच्या खेळांतही संसाराची मांडणी करून तेंच

शिक्षण मुलें घेत असतात. अवेळीं, आणि विद्या पुरी व्हावयाच्या आधींच, लग्न-व्यवहाराची घाई करण्यांत येतें. ज्या वयांत मुलांना विवाहधर्माची कांहीं कल्पनाही नसते अशा बालवयांत त्यांना आम्ही घोड्यावर बसवतों. कधीं तरी शाळेंत घालतों, कांहीं तरी शिकवितों, कधीं तरी आणि कशी तरी एकदां मुंज लावतों, आणि करूं नये त्या वयांत लग्नें करतों. कांहीं प्रांतांत अगदीं लहान अर्भकांचीं लग्नें लावतात, व गुजराथेंत तर पाळण्यांतील मुलांचीं किंवा गरोदर स्त्रियांच्या पोटांतील भावी बालकांचींही, लग्नें लावण्यांत येतात ! म्हणजे अत्यंत पवित्र जो विवाहाश्रम, जो जीवाच्या पुढच्या कार्याचा पाया, तो ‘ आश्रम ’ या वैभवानें आज कोठें दिसत नाहीं–आज त्याची अशी ही दुर्दशा झाली आहे !

अशा दुर्दशेचे दुष्परिणाम जे व्हावयाचे तेच देशभर होत आहेत. मुलांची विद्या नीट होत नाहीं, महत्त्वाचीं कामें करण्याची त्यांना मुळींच हिम्मत रहात नाहीं, शरीर चांगलें सुदृढ रहात नाहीं, काळजी व जबाबदारी यांनीं मुलांना अकाळीं क्षीणता येते, आणि देशांतील एकंदर जोम व सामर्थ्य नष्ट होऊन लोक दुबळे बनले आहेत. ‘ **धी–श्री–स्त्री** ’–विद्या उद्योग विवाह–हा आम्हां आर्यांचा सामाजिक जीवनाचा क्रम. तो सुटला आणि आम्ही अनार्य होऊन पतन पावलों. आधीं धार्मिक व लौकिक विद्या, मग उद्योगधंद्याची सोय, आणि नंतर विवाहाची जबाबदारी, असा क्रम सर्वत्र राहील तर आमचा सामाजिक आणि राष्ट्रीय संसार आज आहे त्याहून जास्त सुखमय होईल.

ज्ञान नाहीं आणि योग्यता नाहीं म्हणून संसारही नीट म्हणजे आत्मोन्नति-कारक होत नाहीं. तो आश्रम म्हणून सद्भावानें नीट पाळला जात नाहीं, व त्यामुळें संसाराचा अनुभव पुरा होत नाहीं म्हणजे त्या प्रकारचा आत्मविकासच होत नाहीं. स्वतःच्या शरिराचें सुख आणि ऐषआराम यापलिकडे आमची जर दृष्टीच जात नाहीं तर मग आजचा संसार हा तो धर्मवान गृहाश्रम कसा होणार !

आश्रमधर्माची ही अशी दशा असतां सेवाश्रम कोण पतकरतो ! उदारधींचा आश्रम ते उदारधीच जाणोत. क्षुद्रधींच्या वांट्याला तो यावयाचा नाहीं. ज्या वयांत हा आश्रम घ्यावयाचा त्या वयांत, आणि अगदीं म्हातारपणींही, कांहीं-कांचे लग्नसोहळे चाललेले असतात. अशा जीवांची विचारी माणसाला कींव

यावी–राग येऊं नये. कारण त्यांना जर बोधच झालेला नाहीं, त्यांच्या जीवाची जर वाढच झालेली नाहीं, तर त्या वृद्धदेहांत रहाणाऱ्या बालजीवांनीं संसाराचे खेळ न खेळावे तर दुसरें काय करावयाचें ? त्या बिचाऱ्यांची उन्नति यानेंच व्हावयाची. म्हणून ते आमरण संसारांत गढून रहातात हें त्यांना उचित होय. असेच जीव आज सर्वत्र वावरत असल्यामुळें सेवाश्रम क्वचितच आचरलेला दिसावा यांत नवल तें काय ? उलट, ज्या समाजांत लहानपणापासून मुलांना चांगलें वळण लागत नाहीं तेथें अशी दुर्दशा नसती तर नवल.

अशी ही तीन आश्रमांची हालहवाल पाहिली. आतां चौथ्या आश्रमाची गोष्ट तरी कशाला काढूं ? योगाश्रमाची आज कोणाला महतीही कळत नाहीं. कांहीं लोक मरतां मरतां सहज मोक्ष हातीं आला तर पहावा म्हणून नांवाचा संन्यास घेतात किंवा तो ते मरणोन्मुख होऊन बेशुद्ध पडल्यावर त्यांस देण्यांत येतो. आत्मविद्येच्या आणि धर्माच्या अज्ञानकाळची ही संन्यासदीक्षेची विटंबना होय. तसेंच कांहीं आळशी आणि विद्याहीन तरुण लोक संन्यासाचें सोंग घेऊन, योगी आणि जोगी होऊन, केवळ भीक मागत फिरत असतात, आणि कधीं कधीं दुराचरण करण्यासही कमी करीत नाहींत. असे धंदेवाईक 'संन्यासी' आज फार झाले आहेत. त्यांना नीट ओळखून आपल्या दाराशीं कोणीं उभे करूं नये हेंच योग्य होय.

आश्रमधर्मांच्या दुर्दशेचें स्वरूप मीं थोडक्यांत सांगितलें. स्वदेशाची आणि स्वदेशबांधवांची अशी हीन दशा पाहून मनाला खंती वाटत असल्यामुळें तिचें वर्णन वक्तृत्वयुक्त वाणीनें फारसें करवत नाहीं–व तसें करण्याची गरजही दिसत नाहीं.

तर सर्वकाळ असें धर्महीन जीवन चाललें असल्यामुळें वरच्या वर्गांतील लोकही नीचावस्थेला पोहंचले आहेत. ज्यांनीं पृथ्वीवर देवाचे प्रतिनिधि म्हणून आचरावें, ज्यांनीं आपल्या पवित्र आचरणानें धर्माची ज्योत जागती ठेवावी, ज्यांनीं अखिल मानवजातीच्या उद्धाराची काळजी वहावी, ते ब्राह्मणच जर आज पतित झाले आहेत तर इतरांना ज्ञानप्रकाश कसा दिसावा ? माझ्या एका मित्राचें कांहीं दिवसांपूर्वीं पत्र आलें आहे त्यांत त्यांनीं एका गांवांतील ब्राह्म-

णांच्या आचरणाची खेदजनक अवस्था वर्णिली आहे. तें प्रासंगिक वाटल्यावरून वाचून दाखवितों—

**श्री.**

**मुकाम....ता० १५ मार्च १९०६.**

**इकडील वातावरण बरेंसें नाहीं. ब्राह्मण वगैरे मंडळी स्वकर्तव्यपराङ्मुख अशी आहे. नेहमीं पैसा कसा मिळेल या खटपटींत व सुख व ऐषआरामाच्या खटपटींत आहेत. कांहीं ब्राह्मण तर कांहींच धंदा न करितां खुशाल हलकटपणानें वागण्यांत आपला आयुष्यक्रम कंठीत आहेत. जणू काय त्यांना हें जग सोडावयाचेंच नाहीं. अशा प्रकारचे वातावरणांत माझी नेमणूक जहालेली आहे.**

**आपला....**

आश्रमधर्मांची आज ही दशा अशी होण्याचें मला एक कारण दिसतें तें हें कीं धर्मांतील जिवंतपणा अगदीं निघून गेला आहे. आत्मविद्येचें सोपपत्तिक शिक्षण लहानपणापासून मिळत नसल्यामुळें, माणसें कसे तरी दिवस लोटतात आणि त्यामुळें त्यांचा मनुष्यजन्म फुकट जातो असें म्हटलें पाहिजे. **धर्मवान** जे तेही जगतात आणि **धर्महीनही** जगतात, पण एक मधमाशीसारखे अनुभवमधूनें समृद्ध होतात आणि दुसरे त्या गांधिलमाशीसारखे फीर फीर फिरून शेवटीं आत्मानुभवामध्यें भिकारी ते भिकारीच रहातात. आपल्याला मध गोळा करावयाचा आहे हें इष्टकार्य न विसरतां **मधमाशी** ही एकसारखे परिश्रम करीत असते; **गांधिलमाशी** केवळ डौलानें हिंडत असते. तसा विचारी माणूस विवेकानें वागून ज्ञानी होतो, आणि अविचारी जो तो ऐषआरामांत काळ घालवितो. जीं फुलें मधमाशी पहाते तींच फुलें गांधिलमाशीही पहाते; पण मधमाशी जाणीव ठेवून त्यांच्या हृदयींचा मध घेते आणि गांधिलमाशी अजाणपणानें इतस्ततः भ्रमण करीत राहून पुष्परूपमायेची शोभा पहाते. विचारी आणि अविचारी एकाच जगांत रहातात; पण एक त्या जगाचें अंतरंग शोधतात आणि दुसरे बहिरंगाच्या रंगांत रंगून जाऊन आत्मघात करून घेतात. सारांश, एक शेवटीं आत्मबोधाचा मध गोळा करून योगयुक्त होतात; दुसऱ्यांच्या कपाळचा वियोगाचा डाग तसाच रहातो.

तर जे लहानपणापासून चांगली विद्या शिकून आत्मवान होत नाहींत, जे

मानवजन्माचा हेतु ओळखीत नाहींत, जे सर्वत्रैव धर्महीनपणानें वागतात आणि अव्यवस्थित रीतीनें आयुष्याचे दिवस लोटतात, त्यांचा जन्म फुकट जातो–ते संसाराचा शीण व्यर्थ करून घेतात. बैल पाठीवर साखरेच्या गोणी वहातो पण त्याच्या तोंडांत गवतच, तसे हे जीव संसाराचें ओझें मात्र वाहतात पण तो ज्या आत्मबोधाचा–ज्या योगाचा–निरोप सांगूं पहातो तो त्यांना ऐकूं येत नाहीं. अशा जीवांविषयीं करुणेनें रामदास म्हणतात—

**आला आला प्राणि जन्मासि आला ।**
**गेला गेला बापुडा व्यर्थ गेला ॥.**

तर आश्रमधर्माची दुर्दशा झाली म्हणून आमच्या लोकांचा आणि देशाचा संसार किती हीन झाला आहे तो पहा!–पहा म्हणतों पण पहावेल तर पहा; आम्हांला तो पहावत नाहीं.

## १०. पुढची वाट.

तर मग याला उपाय काय ? कांहीं उपाय आहे काय ? उपाय असेल तर तो कां करावयाचा, कसा करावयाचा, आणि तो कोणीं करावयाचा ?

मुलांनो हे प्रश्न महत्त्वाचे आहेत, पण आर्यलोक, आर्यधर्म, आर्यदेश, यांची प्राचीन स्थिति त्यांची अर्वाचीन दशा आणि त्यांना पुढें प्राप्त होणारें वैभव याच्या विचाराचा मुख्य विषय आपणांपुढें नसल्यामुळें फक्त सिद्धांतरूपानेंच तो विषय आपल्याला पाहिला पाहिजे.

आश्रमांच्या धर्मात स्त्रीपुरुषांच्या आचरणाचा आणि सगळ्या आयुष्यक्रमाचा विचार येतो. ते धर्म समजल्यावर तद्वत लोक आचरूं लागले तर देशाचें सर्व बाजूंनीं रूप पालटेल असें ज्ञाते सांगतात. पण देशाचें वैभव वाढावें हा विचार जरी गोड असला तरी तो कांहींस फलद्रूप होणें शक्य वाटत नाहीं, आणि कांहींना तो थोडा शक्य वाटतो पण त्याच्या सिद्धीला निराळ्याच उपायाची योजना करावीशी वाटते. कोणी म्हणतात आर्यदेश आर्यधर्म आणि आर्यलोक यांना आतां चांगले दिवस कधींच यावयाचे नाहींत,- तर उगाच परिश्रम तरी कशास घ्या. दुसरे म्हणतात कीं सगळे पाश्चिमात्य आचारविचार आम्हीं पतकरल्याशिवाय आमची स्थिति नीट व्हावयाची नाहीं. तिसरा पक्ष असा आहे कीं आर्यदेश आर्यधर्म आणि आर्यलोक यांचा नाश व्हावयाचा नाहीं; ज्या ऋषींनीं त्यांची पूर्वीं काळजी घेतली त्यांचें तिकडे आतांही लक्ष आहे

आणि आपण आजचे लोक जर पाश्चिमात्य लोकांच्या आचारविचारांत जें चांगलें असेल तें घेऊन सनातनधर्मांतील आचारविचारांचा देशकाल पाहून उद्धार करूं तर देशाच्या आणि धर्माच्या भावी उद्धाराला आपण मदत केली असें होईल. योगिनी आनी बेझंट बाई यांनीं एके ठिकाणीं आमच्या भावी स्थितीविषयीं असा भविष्यवाद केला आहे कीं–'**आर्यदेशाला मागें नव्हती अशी उज्ज्वल राष्ट्रपदवी प्राप्त होणार आहे.**' ज्यांची इच्छा असेल त्यांनीं या कामाला मदत करावी. ती मदत म्हणजे नव्या विचारांत बरें असेल तें घेऊन प्राचीन आचारविचारांचें पुनरुज्जीवन करणें ही होय.

ऋषींचा देश मरणार नाहीं; ऋषींचा धर्म लयास जावयाचा नाहीं. ते नामशेष व्हावयाचे असते तर पूर्वींच झाले असते. तर देव ऋषि आणि संत यांच्या आशीर्वादानें आर्यदेश आर्यलोक आणि आर्यधर्म यांचा खचीत भाग्योदय होणार. या इष्टहेतूच्या सिद्ध्यर्थ आश्रमधर्म वगैरेंचें पुनरुज्जीवन करावयाचें. आत्मोन्नति हा तर हेतु खराच परंतु आत्मोन्नतीची प्राणप्रतिष्ठा राष्ट्रीयतेच्या भूमिकेवर करण्यांत येते, व त्या कामीं देव जे आहेत ते विशिष्ट मानववंशाला मनुष्यतेच्या आत्महितासाठींच साह्य करीत असतात असें आश्वासन मुक्तकंठानें ज्ञात्यांनीं द्यावें हें आपलें केवढें भाग्य होय!

तर आश्रमधर्माची पुढची वाट काय?

आधीं सर्व लोकांत या विषयाचें ज्ञान वाढविलें पाहिजे. आत्मविद्येचे मूलभूत सिद्धांत सर्वत्र शिकविले पाहिजेत. त्यानें सनातनधर्माविषयीं, आणि पर्यायानें त्या धर्माचा ज्या देशांत जन्म झाला त्या देशाविषयीं, लोकांत आदरबुद्धि वाढेल. लोकशिक्षणाबरोबरच चारही आश्रम, विधि आणि आचार यांसह, सर्व लोकांत अमलांत आणण्याचा भगीरथप्रयत्न केला पाहिजे. आणि आश्रमधर्मरूप उदात्त विचारांचें सुंदर चित्र शक्य असेल त्यांनीं रोज मनांत आणण्याचाही प्रयत्न करावा. मानसभूमिकेवर मनोमय चित्र तयार झालें, सूक्ष्मावस्थेंत संकल्पांचीं रूपें निर्माण झालीं, म्हणजे तीं सर्व लोकांस मनोमय स्थितींत समजूं लागतात आणि यथाकालीं व यथानुकूल परिस्थितींत त्यांचें स्थूलीभवन होऊन ते विचार लोक आचरूं लागतात–असा आत्मविद्येचा एक सिद्धांत आहे.

तर पुढची वाट म्हणजे मनानें इष्टगतीची प्रतिमा तयार करणें, वाणीनें शब्दसृष्टींत बोधकार्य करणें, लेखणीनें वाङ्मय तयार करणें, आणि आचरणांत

ते विचार प्रत्यक्ष आणून त्यांचा कार्यविपाक करणें, ही आश्रमधर्मांच्या पुनर्जीवनाची पुढची वाट होय.

आत्मविद्या आणि तदंतर्गत आश्रमधर्मांचे विचार व आचार यांचा प्रचार आजच्या मनूंतही लोकमान्य अशा व्यवस्थित रीतीनें देशभर करतां येईल हें अलिकडच्या काळांत पंजाबांतील आर्यसमाजानें, थिआसफीच्या* प्रवर्तकांनीं, आणि **स्वामी विवेकानंदांसारख्या** एम ए होऊन संन्यासी बनलेल्या थोर विद्वानांनीं अनुभवास आणून दिलें आहे. हेंच काम तर इतरांनाही देशभर करतां येण्यासारखें आहे हें उघड आहे.



आश्रमधर्मांच्या पुनर्जीवनासाठीं कोणत्या धोरणानें व कोणत्या दिशेनें उद्योग केला पाहिजे हें यावरून समजेल. त्यांचें स्वरूप काय आहे, त्यांविषयीं आदर्शविचार कसे आहेत, आणि ते आजच्या मनूंत कसकसे देशकाल पाहून पाळावयाचे, याचें सविस्तर विवेचन पूर्वी आलेंच आहे.

पण ही पुढची वाट कां पतकरावयाची हें मात्र उत्तेजनार्थ नीट लक्षांत ठेवलें पाहिजे. आश्रमधर्माचरण म्हणजे ईश्वराच्या उत्क्रांतिरूप कार्याला मदत करणें होय. ईश्वराच्या मनोगताप्रमाणें वागणें, जीवांची उन्नति करणें, लोकस्थितीला उदात्त स्वरूप आणणें, आणि देशाच्या भावी वैभवाला साह्य करण्याचें थोडेंसें ओझें आपल्या शिरावर घेणें–इतकें जर धर्मवानपणानें साधणार आहे तर कोण अभागी माणूस धर्मविषय शोधून पहाणार नाहीं, धर्म–केवळ धर्म–सदैव आचरणार नाहीं, आणि स्वतः धर्मवान होऊन दुसऱ्याला धर्मवान करण्याचा प्रयत्न करणार नाहीं ? पण काय करावें, लोकांस ज्ञान नाहीं

* थिआसफी म्हणजे आत्मविद्या किंवा ब्रह्मविद्या. तिचा विचार व प्रचार करणाऱ्या मंडळाचें नांव थिआसफिकल सोसायटी असें आहे.

आणि ज्ञान सांगणारीं तोंडें बंद पडलीं आहेत. तीं उघडणें म्हणजेच चारही आश्रम यथाक्रम पाळण्याचा प्रघात पाडणें होय. कारण मग पहिला आश्रम विद्या शिकेल, दुसरा तिचें रक्षण करील, तिसरा ज्ञानाचा प्रसार करून विशेष प्रकारचें धर्मवान आचरण स्वतःच्या उदाहरणानें शिकवील, आणि चौथा ध्यानमार्गानें मनोमय भूमिकेवर सर्वांशीं बोलेल आणि सर्वांचीं मनें इष्ट अशा सत्कार्याकडे न बोलतां वळवील.

असा जीवनयात्रेचा कार्यक्रम जे न पाळतील ते जगून मेल्यासारखे होत असें श्रीकृष्ण म्हणतात.—

एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ।
अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥

' स्त्रीच्या किंवा पुरुषाच्या देहांत रहाणारा जीव जो याप्रमाणें वियोग ते योग स्वतःसिद्ध असलेला वर्तुलमार्ग या कर्मक्षेत्रांत येऊन प्रयत्नानें चालून जाणार नाहीं त्याचा जीवभाव व्यर्थ गेला, त्यानें इंद्रियांचे लळे पुरविण्यांतच अमोल काळ घालविला, तो पार्था व्यर्थ रे जन्मास आला !! '

मुलांनो या वयांत धर्म शिका आणि वरींदारीं सर्वदा असें वर्तन करा, सगळा काळ विवेकानें वागून असा घालवा, कीं तुमच्याविषयीं कृष्णदेवाला असें कठोर वचन बोलावें लागणार नाहीं.

## ११. पण स्त्रियांचें काय ?

मुलींनो, इतका वेळ जें धर्म आश्रम आणि आश्रमधर्म यांचें विवेचन झालें तें जरी एके प्रकारें पुरुषांविषयीं झालें आहे तरी त्यांतील आदर्शविचार स्त्रियांस लागू नाहींत असें नाहीं. धर्म आणि [illegible] विचार सामान्यतः जीवाविषयीं असल्यामुळें ते सर्व माणसांना लागू आहेत. पुरुषदेहधारी जीव तो जर जीव तर स्त्रीदेहधारी जीवही जीवच होय. अशा सर्व जीवांना वियोग ते योग प्रवास करावयाचा असल्यामुळें ज्ञान, विद्या, व्यवहार, संसार, धर्म, आश्रम, आश्रमधर्म हीं सर्व पुरुषांप्रमाणें स्त्रियांकरितांही आहेत. आज धर्म सांगणारे स्त्रियांविषयीं अनुदारपणाचें प्रतिपादन करतात हें खरें, पण तो अज्ञानमूलक एकतर्फी न्याय होय. आपण आज आत्मविद्येच्या दृष्टीनें पहात आहों. तर देह स्त्रीचा असो कीं पुरुषाचा असो त्यांत आत्मानुभवासाठीं येऊन रहाणारे देही जीव जे आहेत त्या सर्वांना आश्रम आणि आश्रमधर्म ह्यांविषयींचे विचार लागू आहेत.

ज्ञानाचा आणि धर्माचा जो स्त्रीपुरुषांना अधिकार आहे तो देवदत्त किंवा नैसर्गिक आहे. तो कोणी देत नाहीं कीं घेत नाहीं. ज्याचा त्यानें ओळखून मात्र वागलें पाहिजे. ‘ अधिकार नाहीं ’ ‘ अधिकार नाहीं ’ असा अनुदार-धींचा घोष चालला असतांनाही जगाच्या रंगभूमीवर स्त्रीदेहधारी जीवांनीं आपापलीं कामें पुरुषांप्रमाणेंच केलीं आहेत. त्यांनीं कौशल्याचीं कामें केलीं, त्यांनीं वेदमंत्र पाहिले, त्यांनीं पृथ्वीपतीची गादी चालविली, त्यांनीं क्वचित समरभूमीवर हातीं शस्त्रही धरलें, त्यांनीं देवाची भक्ति केली, त्यांनीं योग साधला, त्यांनीं जगाला बोध केला, त्यांनीं शेतांत आणि मळ्यांत अंगमेहनतीचीं कामें केलीं, त्यांनीं आधुनिक गिरण्यांत व कारखान्यांत उद्योग केला, त्यांनीं व्यापार केला, त्यांनीं ग्रंथ लिहिले—त्यांना प्रसंग मिळाला असतां कोणतीं कामें करतां आलीं नाहींत तें सांगा ? जसजसा प्रसंग मिळाला तसतशीं त्यांनीं कामें केलीं आहेत. अशक्त स्त्रियांना सशक्त पुरुषांचीं कामें कशीं होतील असा कोणी प्रश्न विचारतात. कबूल. पण अशक्त स्त्रियांची तुलना तुम्ही सशक्त पुरुषांशीं कां करतां ? जो तो आपापल्या शक्तीप्रमाणें काम करील हेंच म्हणणें जास्त सयुक्तिक दिसतें. सारांश काय कीं देह कोणताही असला तरी त्यांतील जीव जो आहे तो आत्मशक्तिमान असल्यामुळें तो आत्मानुभवार्थ त्या देहांना नानाविध प्रकारांनीं जगांत कामाला लावतो, आणि अंतीं परमगति जी आहे ती सर्व जीवांना मिळावयाची आहे. म्हणून श्रीकृष्ण म्हणतात—

**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिं ॥**

म्हणजे जीव स्त्रीदेहांत असोत कीं इतर देहांत असोत त्यांचा उद्योग व प्रयत्न अंतर्यामींच्या स्फूर्तीनें आणि बाहेरील परिस्थितीप्रमाणें सर्व दिशांनीं चालावयाचाच आहे.

सामान्य व्यवहाराचा विचार घेतला तरी स्त्रियांना स्वतःसाठीं उद्योग करतां यावा, ज्ञानानें येणारें सामर्थ्य अंगीं यावें, जग कसें चाललें आहे आणि व्यवहार कोणत्या नियमांनीं होत आहे हें त्यांना कळावें, ही त्यांच्या स्वसंरक्षणाची उत्तम तयारी होय. म्हणून मनूचें शास्त्र सांगतें—

**अरक्षिता गृहे रुद्धाः पुरुषैराप्तकारिभिः ।**
**आत्मानमात्मना यास्तु रक्षेयुस्ताः सुरक्षिताः ॥**

‘ आप्तपुरुषांनीं घरांत कोंडून ठेवल्या म्हणजे स्त्रियांचें रक्षण झालें असें नव्हे,

तर ज्या स्वतःचें रक्षण करण्यास स्वतः समर्थ होतील त्या खऱ्या सुरक्षित समजाव्या ' ( ९-१२ ).

तर सर्व प्रकारची सिद्धता ज्या चार आश्रमांच्या धर्मांत आहे ते स्त्रियांसाठींही आहेत. त्यांच्या देहांतील जीवांना स्वोन्नतीसाठीं त्यांचें आचरण महत्त्वाचें आहे. मात्र आजच्या मनूंत कसेंही करून त्यांना चांगली विद्या मिळाल्याशिवाय त्यांना हें धर्माचरण आत्मविकासपर करतां यावयाचें नाहीं. तर जे आत्मवादी आहेत, जे देशहितवादी आहेत, जे धर्मजीवनवादी आहेत, त्यांनीं प्रत्येक मुलीला चांगली विद्या मिळेल तिच्या मनावर चांगले आणि शाश्वत संस्कार होतील आणि जीव ह्या नात्यानें तिला आपलें आत्महित कशांत आहे हें समजेल, अशी तजवीज तिला विद्याश्रमाची दीक्षा देऊन करावी हेंच आमच्या माणुसपणाला योग्य होय.

## १२. स्त्रियांचा विद्याश्रम.

उन्नतावस्थेचा संकल्प केला म्हणजे मनाला उन्नतावस्था प्राप्त होते; नीचावस्थेचा संकल्प केला म्हणजे मन नीचावस्थेप्रत जातें. हा नियम आश्रमधर्मांत दिसून येतो. मनुष्याचें साधारण आहारनिद्रादि पशुसारखेंच जीवन, पण त्याला ऋषींनीं कसें वैभव प्राप्त करून दिलें पहा ! त्याचा त्यांनीं धर्म ओळखला, त्याचा विनियोग त्यांनीं आत्मोन्नतीकडे केला. अशा रीतीनें त्यांनीं मानवजन्माची योग्यता वाढवून त्याला देवकळा प्राप्त करून दिली. या धोरणानें चार आश्रमांचे आदर्शविचार कोणते ते आपण पाहिले.

आश्रमधर्मांचें कार्य आत्मोन्नति व तिच्या अनुषंगानें सामाजिक व्यवस्था आणि श्रमविभाग किंवा कार्यविभाग होय. ही योजना जशी पुरुषदेहधारी जीवांना हितावह तशी ती स्त्रीदेहधारी जीवांनाही हितावह होय. पुरुषांच्या जीविताप्रमाणेंच स्त्रियांच्या जीवितालाही आश्रमधर्मांचें नियमन लावून तें उज्ज्वल करणें हें देश धर्म आणि समाज यांच्या पुनरुज्जीवनाचें एक श्रेष्ठ साधन होय.

तर स्त्रियांच्याही आयुष्याचा पहिला भाग विद्याश्रमांत जावा हा सनातनधर्माचा हेतु दिसतो. प्रत्येक स्त्रीला जर आम्ही विद्याश्रमाची दीक्षा देऊं तर तिची सामाजिक योग्यता वाढेल, तिची बुद्धि विकास पावेल, तिच्या आत्मोन्नतीला जास्त मदत होईल, आणि लोकहिताच्या किंवा देशहिताच्या कामाला मदत करण्याची शक्ति तिला जास्त येईल. विद्या जर पवित्र तर त्या पवित्र वस्तूची जोड

आम्हीं राष्ट्रांतील स्त्रियांना करून देऊं नये काय ? ' **विद्याविहीनः पशुः** ' हें जर खरें तर स्त्रियांना विद्याहीन ठेवून पशुसारख्या अडाणी ठेवाव्या काय ? खचीत आत्म्याची काळजी वाहणाऱ्या सनातनधर्माचा हा सिद्धांत नव्हे.

स्त्रियांना विद्या पाहिजे ही गोष्ट एकदां मान्य झाली म्हणजे विद्यार्जनाची व्यवस्था लावणाऱ्या विद्याश्रमाचा विचार ओघानेंच येतो. या आश्रमाचें स्वरूप काय, त्यांत एकनिष्ठपणानें विद्या कशी केली पाहिजे, शरीर मन बुद्धि आत्मा ह्यांवर संस्कार करणारें शिक्षण कसें द्यावयाचें, त्याचा विधि व आचार कोणता, वगैरे आदर्शविचार पूर्वीं सांगितले तेच येथें लागू आहेत. एक दोन गोष्टी मात्र विशेष रीतीनें सांगण्यासारख्या आहेत तितक्या पाहूं म्हणजे झालें.

विद्याश्रमाची दीक्षा उपनयनावांचून शक्य नाहीं. मुलांप्रमाणें मुलींनाही विद्या आणि विद्याश्रम पाहिजे तर **त्यांचा उपनयनविधीही झाला पाहिजे** हें उघड आहे. सनातनधर्मांत हा अनेक बाजूंनीं अत्यंत महत्त्वाचा आचार होय. तो अनार्याला आर्य **करतो, त्याचे सूक्ष्मदेहावर संस्कार** होतात, तो विद्याव्रताचे विचार जागृत करतो, आणि त्यानें बरोबर आणलेलें संध्यावंदन व अभिमंत्रित यज्ञोपवीत हीं अनिष्टबाधेपासून जीवाचें सदोदित रक्षण करतात. म्हणून प्रत्येक मुलीचें उपनयन करून तिला विद्यार्जनाचें आणि यथाकालीं समावर्तन होईपर्यंत विवाह न करण्याचें व्रत लावून द्यावें हें अनेक बाजूंनीं इष्ट होय.

प्राचीन काळीं आर्यस्त्रियांचें उयनयन होत असे. तें झाल्यावर त्यांना विद्या शिकवीत; व निरंतर अविवाहित राहून ज्या स्त्रिया विद्या शिकण्याचें व शिकविण्याचें व्रत घेत त्यांना **ब्रह्मवादिनी** म्हणत. असें एक वचन आहे कीं

**पुराकल्पे तु नारीणां मौंजीबंधनमिष्यते ।**

' पूर्वीं स्त्रियांचें उपनयन इष्ट मानीत असत. ' आजही पंजाबांत आर्यसमाजाच्या विद्यमानें मुलींचें उपनयन होतें व त्या संस्कृतांत संध्याही शिकतात. तसेंच छंदःशाखेचे आर्य जे पारशीलोक ते मुलींचें उपनयन करतात. सारांश हा विधि महत्त्वाचा असून क्वचित रूढही आहे. तो सर्वत्र रूढ करावयाचा इतकेंच काय तें राष्ट्रहितवाद्यांचें आणि धर्मवाद्यांचें काम आहे.

धर्मशास्त्र जो पाहील त्याला सहज दिसून येईल कीं ह्या विधीला फार वेळ नको, फार श्रम नकोत, फार पैसा नको. प्रेम मात्र पाहिजे. आर्यांचें स्मारक,

ऋषींची आज्ञा, धर्माचा आधार, अशा ह्या विधीवर जर प्रेम करूं तर पैशाची सबब कधींही पुढें यावयाची नाहीं. जेथें प्रेमाची स्फूर्ति होईल तेथें अल्प दक्षिणा मान्य करणारे उपाध्याय मिळतील, आणि डामडौल न करतां चार आप्तमित्रांसमक्ष किंवा अग्निदेवाच्या साक्षीनें उपनयनाचा पवित्र विधि करणारे मुलांमुलींचे यजमान आईबापही सांपडतील. आज धर्मशास्त्र पाहून कोणी तें समजून घेत नाहींत, किंवा यजमानांस तें समजवून सांगण्याचें कर्तव्य उपाध्याय करीत नाहींत, म्हणून उपनयनादि पवित्र धर्माचार खर्चाचे होऊन लोकांस नकोसे झाले आहेत. याचा विचार सर्व विचारी स्त्रीपुरुषांनीं अवश्य करावा.

मुलींना विद्या पाहिजे म्हणून विद्याश्रम पाहिजे व त्यासाठीं उपनयन पाहिजे. या विचारांबरोबरच, त्यांना या आश्रमाचे धर्म पाळतां यावे आणि कांहीं दिवस विद्या मिळवितां यावी **म्हणून त्यांचें लग्न बालपणीं होऊं नये,** हा विचार सहजच येतो. लहानपणचें **बायकोपण** बंद झालें म्हणजे लहानपणचें **आईपण** व लहानपणचें **विधवापण** सहजच बंद होईल. तर स्त्रियांच्या विद्याश्रमांत त्यांना विद्यार्जन हें एकच काम एकनिष्ठपणानें करूं द्यावें हें बरें. असें आपण करूं तरच गृहाश्रम त्यांना चांगला करतां येईल व त्याला लागणारें शरीरबळ, मनोबळ, बुद्धिबळ आणि आत्मबळ याची जोड गृहाश्रमाचें जड ओझें अंगावर घ्यावयाच्या आधींच करून घेतां येईल. पुढें गृहिणी, सेवक, ब्रम्हवादिनी, योगिनी ही पदवी प्राप्त करून घ्यावयाची आहे, तर प्रत्येक स्त्रीनें आधीं प्रथमाश्रमांत विद्यार्थिनी होऊन ज्ञानवान झाल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

विद्याश्रमांत मुलींनीं कोणती विद्या शिकावी ह्याचें विवेचन येथें करतां येत नाहीं. इतकें खरें कीं त्यांचें शिक्षण थेट अगदीं मुलांसारखें असूं नये. त्यांच्या शिक्षणांत याप्रमाणें विषय असावे असें सामान्यतः सांगतां येईल; म्हणजे—

( १ ) **स्वभाषा.** ही चांगली आल्यानें दुसऱ्या ज्ञानाचें एक साधन हातीं आल्यासारखें होतें. मराठी, गुजराथी, वगैरे प्रांतिक भाषा ह्या त्या त्या ठिकाणच्या स्वभाषा होत. सांप्रत मुलींच्या शाळांत स्वभाषा नीट शिकवीत नाहींत हें बरें नव्हे.

( २ ) **धर्म व नीति.** यांचें परिशीलन विशेषतः संतांच्या प्राकृत ग्रंथांच्या

आधारानें मुलींकडून अवश्य करविलें पाहिजे. मनूच्या विचाराप्रमाणें स्त्रिया स्वतः ' सुरक्षित ' होण्यास जशी व्यवहारज्ञानाची तशी धर्मनीतिज्ञानाचीही गरज आहे.

( ३ ) **संस्कृत.** संस्कारयुक्त जी संस्कृत भाषा ती इतर प्राकृत भाषांची जननी होय. संस्कृताच्या आधाराशिवाय बोलण्याच्या व लिहिण्याच्या स्वभाषेला भारदस्तपणा यावयाचा नाहीं. भारत, रामायण, इत्यादि ज्ञान-भांडाराचे ग्रंथ संस्कृतांत अहेत, ते तिच्या ओळखीबरोबर स्त्रियांना आपलेसे करून घेतां येतील. समजण्यापुरती संस्कृत भाषा मुलींना वरच्या वर्गांत गुरु चांगला आस्थेवाईक असेल तर थोड्या आयासानें शिकवितां येईल. मुलांच्या शाळांत आज केवळ संस्कृताचें निर्जीव असें व्याकरण शिकवितात त्यामुळें संस्कृताचा विनाकारण बाऊ वाटतो. तर मुलींना ती भाषा समजेल अशी सोपेपणानें शिकवावी, व अशी शिकविली तर त्या ती मोठ्या हौसेनें शिकतात असा माझा अनुभव आहे.

( ४ ) **सामान्य शिक्षण.** यांत गणित, इतिहास, भूगोल, यांचा समावेश व्हावा, व इतर माहिती अशी मिळावी कीं त्यांना व्यवहार चांगला समजेल.

( ५ ) **शास्त्रीय ज्ञान.** सृष्टिशास्त्र, शरीरशास्त्र, अन्नशास्त्र यांचें शिक्षण सप्रयोग व सचित्र असावें.

( ६ ) **चरित्रविषय.** हा विषय मुलींच्या शिक्षणांत अवश्य असावा. यांत ह्या देशांतील व इंग्लंड जपान वगैरे परदेशांतील सद्गुणी, निश्चयी, विद्वान, परोपकारी, भक्त, योगिनी अशा स्त्रियांचीं चरित्रें शिकवावीं.

( ७ ) **इंग्रजी.** आजच्या मनूंत प्रत्येक मुलीला संस्कृताप्रमाणेंच भाषा समजेल इतकें इंग्रजी शिकवावें. त्यानें एक अर्वाचीन ज्ञानाचें साधन हातीं येईल इतकेंच नव्हे तर व्यवहार चांगला कळून पुरुषांच्या कामांत त्यांना मदत करण्याचें सामर्थ्य येईल.

मुलींनो ' इतकी विद्या आम्हांला चांगली शिकवा ' असा प्रेमाचा आग्रह तुम्ही धरून बसलां तर तो आईबाप खचीत पुरवितील. इतर हट्ट धरून तुम्हीं आजवर आईला किती तरी छळलें असेल ! आतां विद्येचा हट्ट धरून बसा, आई तो पुरवील. आणि आईनें मनांत आणलें म्हणजे बापाची काळजी

नको ! मुलींनो तुमच्या विद्येची जशी तुमच्याच उन्नतीला तशी देशाच्या आणि धर्माच्या उद्धाराला फार गरज आहे बरें ! तुमच्यांत भक्ति आहे तशी आमच्यांत नाहीं, तुमच्यांत निर्धार आहे तो आमच्यांत नाहीं, तुम्ही प्रेमासाठीं जें सर्वस्वाचें समर्पण कराल तें आम्ही करणार नाहीं ! हे तुमचे गुण मोलवान आहेत. ते देशाच्या आणि धर्माच्या कामाला तुमच्याकडून लावविणारे सत्पुरुष ह्या पतित राष्ट्रांत कधीं जन्मास येतील कोण जाणे ! तुम्ही एकदां **ज्ञानदीप** हातीं घेऊन जगाच्या उद्धाराला निघालां तर कोठकोठचा तरी काळोख नाहींसा कराल! लोकसेवा, ज्ञानदान, धर्मकार्य, देशाचा उद्धार हे विषय एकदां तुम्हीं आपलेसे केले तर आर्यत्वाची मालवूं पहाणारी ज्योत सतेज होऊन तेवूं लागेल. ही तुमची कामगिरी तुम्हांला विद्येनें दिसून येईल. म्हणून तुम्ही विद्याश्रमाचें धर्मव्रत पतकरून ती पुष्कळशी मिळवा–आळस करूं नका.

विद्येच्या संबंधानें पहातां आज हिंदुस्थानांतील स्त्रियांची स्थिति चांगलीशी नाहीं. ती सुधारण्याचे प्रयत्न अनेक दिशांनीं आज होत आहेत. योगिनी आनी बेझंट बाईनीं देखील हा विषय हातीं घेतला आहे. मुलींनीं कसलीच विद्या शिकूं नये असें म्हणणारे आतां फार थोडे लोक आहेत. पण शिक्षण देणाऱ्या चांगल्या संस्था नाहींत व मुलींना विद्या शिकण्यास उत्तेजन मिळत नाहीं. मुलींच्या शिक्षणाची जर चांगली सोय होईल तर 'स्त्रियांचा विद्याश्रम' ही व्यवस्था कांहीं तरी सार्थ होईल. देव करो आणि आजच्या प्रयत्नांना यश येऊन मुलांप्रमाणेंच मुलींनाही विद्या शिकवावी हा आर्यांच्या शास्त्रकारांचा मनोदय फारां दिवसांनीं पूर्ण होवो.

मुलींनो तुमच्या विद्येची काळजी आईबापांना नसेल इतकी शास्त्रकारांना आहे. मुलांच्या शिक्षणाचा विचार केल्यावर कन्येच्या संबंधानें ते कशी आज्ञा करतात ती पहा—

**कन्याप्येवं पालनीया शिक्षणीया च यत्नतः ।**

'एवं म्हणजे याप्रमाणें–मुलांप्रमाणेंच–कन्येचेंही पालन आणि शिक्षण मोठ्या प्रयत्नानें करावें.' यांत जसा एवं तसाच प्रयत्नतः हा शब्द महत्त्वाचा आहे. मुली शाळेंत जातात, फी भरतात, कांहीं तरी शिकतात, हें 'प्रयत्नतः' शिक्षण नव्हे. त्याची नीट काळजी घेतली पाहिजे व त्या शाळेंत जाऊन काय शिकतात, त्यांचे गुरु कसे आहेत, वगैरे गोष्टींकडे नीट बारकाईनें लक्ष दिलें

पाहिजे. 'प्रयत्नतः' शिक्षण गोपाळरावांनीं आनंदीबाईला कसें दिलें तें त्यांच्या चरित्रांत पहावें.

## १३. स्त्रियांचा गृहाश्रम.

पहिला, तिसरा, आणि चौथा हे आश्रम एकेकट्याचे आहेत, म्हणून स्त्रियांविषयीं आणि पुरुषांविषयीं असा कांहींसा निराळा विचार तेथें शक्य आहे. पण तशी गोष्ट दुसऱ्या म्हणजे गृहाश्रमाची नाहीं. गृहाश्रम दोघांचा असून एकमेकांच्या साहचर्यानेंच त्याचें आश्रमत्व शक्य होतें, म्हणून पूर्वीचें गृहाश्रमाचें विवेचन स्त्री आणि पुरुष ह्या दोघांसही एकसारखेंच लागू आहे. तर पुरुषदेहांतील जीवांप्रमाणेंच स्त्रीदेहांतील जीवांनींही ते आदर्शविचार पुढें ठेवून संसारांत वागावें म्हणजे वियोग ते योग त्यांच्या जीवांचें प्रगमन होत असतां देवाच्या शाश्वत नियमांप्रमाणें त्यांना आत्मोन्नतिरूप दिव्य फळाची प्राप्ति झाल्यावांचून रहावयाची नाहीं.

आर्यदेशांतील गृहिणींनो तुमचा आजचा संसार पवित्र व सहेतुक गृहाश्रम असा पाळला जात नाहीं. विद्याश्रमांतील विद्या तुमच्या संसाराचा गृहाश्रम बनवील व जीवितहेतूची ओळख करून देऊन पुढच्या कर्तव्याचीही वाट दाखवील.

पुरुषाचा गृहाश्रम स्त्रीच्या धर्मवानपणावर सर्वस्वीं अवलंबून आहे म्हणून शास्त्र म्हणतें **'गृहिणी गृहमुच्यते'**—गृहिणी आहे तेंच गृह आहे आणि असें गृह आहे म्हणून गृहाश्रम आहे. गृहिणीचें आचरण धर्मवान असलें तर दोघांचा गृहाश्रम चांगला होईल; गृहिणीचें आचरण धर्महीन असलें तर दोघांचाही आश्रमहेतु सफळ व्हावयाचा नाहीं. स्त्रिया चंचल वृत्तीच्या असतात असें कोणी म्हणतात, पण त्या धीरोदात्त विवेकी संयमी आणि योगिनी झाल्याचींही उदाहरणें आहेत. त्यांना आपली जीभ, आपलें मन, आपल्या वासना स्वाधीन ठेवणें शक्य नसतें—हें त्यांना विवेकप्राप्य व प्रयत्नसाध्य नसतें—तर तसें त्यांनीं वागावें म्हणून मनु सांगता ना. साध्वीची व्याख्या करतांना मनु म्हणतो 'मनोवाग्देहसंयता' (९. १६९). साध्वींचें मन, साध्वींची वाचा, साध्वींच्या देहवासना, त्यांच्या स्वाधीन असतात! पहा बोध करण्याची रीत कशी ती. तुम्ही साध्वी म्हणजे सदाचरणी व्हा, तसें होण्यास हा त्रिदंडी आत्मविजय साधा, व तें तुम्हां स्त्रियांना साधणार नाहीं असें कोणी

म्हणेल तर मनु म्हणतो त्याला माझें नांव सांगा. तर गृहिणींनो अशी गुणवत्ता अंगीं आणून तुम्ही वागा म्हणजे तुम्ही कष्टमय संसाराचा धर्माश्रम बनवाल! तुमची मनोवृत्ति नीट नसल्यामुळेंच पुरुषांचीं संसारदुःखें वाढतात ही गोष्ट खोटी कीं खरी हें तुम्हीच सांगा. उत्तम गृहिणीच्या मनोवृत्तीचें वर्णन मनूनें असें केलें आहे—

**सदा प्रहृष्टया भाव्यं गृहकार्येषु दक्षया ।**

तिनें सदा प्रशांतचित्तानें वागून गृहकार्यांत दक्ष असावें (९.१५०). पण हे गुण सहज वाटेवर पडलेले नाहींत. ते ज्ञानानें आणि व्यवहार नीट ओळखल्यानेंच अंगीं येणारे आहेत.

तर आजच्या बदललेल्या मनूंत देशकार्य आणि धर्मकार्य ह्यांचाही गृहाश्रम-धर्मांत अंतर्भाव होत असल्यामुळें त्या दिशेनेंही स्त्रियांनीं आपलीं कर्तव्यें ओळखून पुरुषांच्या सह-धर्म-चारिणी व्हावें. परस्परांचें नातें कसें आहे हें पूर्वीं कामंदकीच्या वचनांत आलेंच आहे. तोच विचार दुसऱ्या एका वचनांत थोडा फेरफार करून असा सांगतां येईल—

**गृहिणी सचिवः सखी मिथः ।**
**प्रियशिष्या विविधे सुशिक्षणे ॥**

पुरुषाला स्त्री अशी आहे. ती गृहिणी, गृहाला गृहपणा आणणारी; ती **सचिव**, पतीला हितबोध करणारी; ती येरव्हीं सखी, त्याचा बरोबरीचा **मित्र**; आणि ह्या सर्व कामांची योग्यता अंगीं येण्यासाठीं ती प्रियशिष्या, **म्हणून** पतीनें तिला विविध प्रकारचें सुशिक्षण द्यावें !

तर अशी योग्यता स्त्रियांनीं अंगीं आणून वर्तन केलें म्हणजे सहजच आत्म-विकास होऊन त्या तिसऱ्या आश्रमांत प्रवेश करत्या होतील.

## १४. स्त्रियांचा सेवाश्रम.

विद्याश्रमांत विद्या मिळून जर आपल्यांत आत्मा आहे आणि आपल्याला ज्ञानी होतां येतें इतकें स्त्रियांना कळेल, आणि गृहाश्रमांत जर अनुभव येऊन दृष्टि व्यापक मन उदार आणि जीवात्मा ज्ञानी होईल, तर त्यांची कर्तव्याची मर्यादाही सहजगत्या वाढेल. अशा जीवांचा आश्रम तो सेवाश्रम होय. हा आश्रम मनाच्या भावनेवर अवलंबून असल्यामुळें त्याचे अधिकारी स्त्रीपुरुष सारखेच आत्मगुणसंपन्न असावयाचे. म्हणून पूर्वींचें सेवाश्रमाचें विवेचन

येथेंही लागू आहे. कांहीं एक दोन विचार स्त्रियांसंबंधानें निराळे सांगावयाचे आहेत तितकेच येथें सांगतों.

सेवाश्रमाची दीक्षा घेऊन त्या आश्रमाचीं कर्तव्यें यथासांग करण्यास स्त्रिया एकट्याच असल्या पाहिजेत असें नाहीं. त्यांच्या पतीच्या हयातींतही हें काम त्यांना करतां येईल, व तशीं प्रत्यक्ष उदाहरणेंही आहेत. पति हयात असूनही गृहाश्रम पुरा ज्यांचा झाला अशा स्त्रिया असणें शक्य आहे. त्यांना पतीच्या संमतीनें सेवाश्रमाचा अंगीकार करतां येईल; किंवा सेवाश्रमस्थ पतीबरोबरच सेवाश्रमी बनतां येईल. मात्र इतकें खरें कीं मुलेंबाळें नसतील अशा विद्यासंपन्न विधवा स्त्रियांस हा आश्रम साधणें जरा सोपें आहे.

पुण्यास सेवाश्रमी रा० धोंडोपंत कर्वे ह्यांनीं विधवा स्त्रियांच्या विद्येसाठीं **अनाथबालिकाश्रम** म्हणून आश्रम बांधला आहे. त्याच्या मदतीसाठीं व विधवांचीं दुःखें लोकांस सांगून त्यांची दया आणण्यासाठीं **पार्वतीबाई** आठवले **काशीबाई** देवधर आणि **वेणूबाई** नामजोशी ह्या तिघी जणी परिव्राजक होऊन प्रांतोप्रांतीं हिंडत आहेत. अशा परोपकाराच्या कामांत आणि ज्ञानदानांत त्या आपलें आयुष्य घालवीत आहेत. हा त्या स्त्रियांचा सेवाश्रम होय.

**डा० आना किन्सफर्ड एम. डी.** ह्या बाईची एक विलक्षण कथा आहे. तिचा विवाह झाल्यावर अगदीं अल्पकाळ ती पतीजवळ होती. पुढें वैद्यकशास्त्र शिकून गरिबांच्या उपयोगीं पडावें असा तिनें निर्धार केला आणि पतीची परवानगी मागितली. विवेकी पतीनेंही तितक्याच थोर मनानें, मानवजातीचें दुःख कमी करूं पहाणाऱ्या आपल्या प्रियपत्नीचें अभिनंदन केलें, आणि तिला संसार सोडण्यास परवानगी दिली. ती पुढें विद्या शिकून एम. डी. झाली आणि जन्मभर गरीब मनुष्यांच्या उपयोगीं पडली, इतकेंच नव्हे तर डाक्टर-लोक शास्त्रशोधाच्या निमित्तानें जिवंत जनावरें कापतात तें सहन न होऊन तिनें त्यांचाही कैवार घेतला होता. गृहाश्रमाचा अनुभव पुरा होतांच आत्म-विकासधर्माचा स्वीकार करणाऱ्या उदारधी डा० आना किन्सफर्ड बाईचा हा सेवाश्रम होय.

केडगांवकर **पंडिता रमाबाई** ह्यांनीं वीस पंचवीस वर्षें विद्याश्रमांत घालवून चांगलें ज्ञान संपादन केलें आणि निराश्रित होऊन पडल्यावर विवाह केला. त्या दुसऱ्या आश्रमांत आठ दहा महिनेच काय त्या होत्या. नंतर आज कित्येक

वर्षे हजार दीडहजार मुलींचें संगोपन करून त्यांना विद्या शिकविण्यांत आणि आपल्या समजुतीप्रमाणें त्यांची सामाजिक उन्नति करण्यांत आपल्या आयुष्याचे दिवस घालवीत आहेत. हा पंडिता रमाबाईचा सेवाश्रम होय.

मुंबईस एका हिंदु कुटुंबांत अशी गोष्ट घडली. पत्नीचा गृहाश्रमाचा अनुभव पुरा झाला तसा पतीचा झाला नव्हता. पत्नीनें पतीच्या संमतीनें संसार सोडला आणि पतीनें पत्नीच्या–आतां विवाहबंधमुक्त झालेल्या त्या स्त्रीच्या–संमतीनें दुसरें लग्न केलें. अनुभव पुरा होतांच आत्मविकासधर्मानें तिला संसारांत ठेवलें नाहीं आणि विचारी पतीनेंही आग्रह धरला नाहीं. बाईनें पुढें पुष्कळ वर्षें पोथीपुराण वाचण्यांत, ईश्वरभजनांत, आणि गरिबांस यथाशक्ति दानधर्म करण्यांत समाधानानें घालविलीं. हा त्या बाईचा सेवाश्रम ( व कांहींसा योगाश्रमही ) होय.

याप्रमाणें देवकार्य, धर्मकार्य, देशकार्य, मनुजकार्य, ज्ञानकार्य, किंवा दुसरें कोणतेंही सेवाश्रमांतील काम करण्याची स्त्रियांना बुद्धि झाल्यास त्यांना तें करतां येईल; मग त्या वडिलांच्या परवानगीनें कुमारपणीं तें काम करोत, पतीच्या परवानगीनें मोठेपणीं करोत, किंवा विधवा असतां स्वतःच्या हिमतीवर करोत. उदारवृत्तीच्या स्त्रियांना हा आश्रम शक्य आहे, किंवा तो पतकरणें हा त्यांचा धर्म आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

सेवाश्रमवासी उदारधी स्त्रियांनीं परिव्राजक होऊन परोपकाराचीं कामें केल्याचीं अनेक उदाहरणें आहेत. त्यांनीं मानवजातीच्या इतिहासाला शोभा आणि पवित्रता आणली आहे. धर्मकार्यांतही ज्ञानप्रसाराचें आणि क्लेशनिवारणाचें काम सेवाश्रमस्थ परिव्राजिकांनीं पुष्कळ केलें आहे. **ब्राह्मणधर्मांत** अशांना आचार्या किंवा ब्रह्मवादिनी म्हणत. त्या वेद शिकवीत आणि आर्यधर्माच्या प्रसाराला मदत करीत. अशी स्त्रियांची मदत होती म्हणूनच त्या काळीं परक्या देशांत वसाहत करण्यास आलेल्या आर्यांच्या धर्मव्यवस्थेला व समाजघटनेला स्थिरता आली. देशाचा अर्धा भाग स्त्रिया आहेत. त्यांच्यांत कालानुरूप ज्ञानप्रसार करण्यास व इष्ट विचारक्रांति घडवून आणण्यास स्त्रीसेवकांचीच फार गरज आहे. पुढें **बौद्धधर्मांत** गौतममुनीनें तर अशा सेवाश्रमस्थ स्त्रियांचा एक मोठा संघ तयार केला होता. आणि नियमबद्ध संघव्यवस्था केली म्हणूनच गौतममुनीच्या नूतन विचारांचा प्रसार होऊन सर्वत्र अम्मल

बसण्यास सोपें गेलें. मूळपुरुष निघून गेल्यावर पुरुषसेवकांप्रमाणेंच ह्या स्त्रीसेवकांनींही खपून गौतमाचें धर्मकार्य पुष्कळ दिवस जागतें ठेवलें. अशा बौद्ध परिव्राजिकांना भिक्षुणी म्हणत. त्या फार विद्वान व ज्ञानी असत. मुलांनो हीं चित्रें पहा—





तीं पुरुषसेवक **भिक्षु** आणि स्त्रीसेवक **भिक्षुणी** यांचीं आहेत. दोन हजार वर्षांपूर्वी हे स्त्रीपुरुष सेवक असा दीक्षावेष घेऊन ह्या व शेजारच्या देशांत काम करीत असत. गौतममुनीच्या ह्या आचाराचें अनुकरण पुढें **कृस्तीधर्मांत** होऊन मठवासी मंक आणि मठवासिनी नन् असे जोगिजोगिणींचे संघ निर्माण झाले आणि त्यांनीं बौद्ध भिक्षूंचा व भिक्षुणींचा वेष घेऊन मोठें अलौकिक धर्मकार्य यूरोपाच्या अज्ञानकाळांत केलें. स्त्रियांनीं पुरुषांप्रमाणें सेवाश्रम पतकरून ब्राम्हणधर्मांत बौद्धधर्मांत आणि कृस्तीधर्मांत काम करून त्या त्या काळीं विचारक्रांति घडवून आणल्याची साक्ष इतिहासांत आहे. आजच्या आमच्या स्त्रियांना जर सद्विद्या मिळेल तर त्याही सेवाश्रमाची दीक्षा घेऊन जनहिताचीं व देशहिताचीं कामें करतील; आपलें सगळें आयुष्य केवळ खाण्यापिण्याच्या क्षुद्र जीवनांत घालविणार नाहींत. कृस्ती मिशनरी बायांचें काम पाहून आम्हांला

नवल वाटतें, पण तसलीं कामें आमच्या स्त्रियांनीं पूर्वीं केलेलीं आहेत हें विसरतां कामा नये.

**जैनधर्मांत** श्वेतांबर आणि पीतांबर अशा दोन शाखा आहेत. त्यांत श्वेतांबर शाखेच्या स्त्रिया देखील पुरुषांप्रमाणें यतिदीक्षा घेऊन सेवाश्रम पतकरतात. त्या मुख्यतः ज्ञानदानाचेंच काम करतात. त्यांना यतिदीक्षेचे जे नियम पाळावे लागतात त्यांत एक नियम असा आहे कीं घरोघर जाऊन संसारी स्त्रियांस विद्या शिकवावी व धर्मबोध करावा. पहा हा परिव्राजकपणाचा धर्म संसारी माणसांच्या किती उपयोगी आहे ! आमच्या जैन बंधूंच्या मुली, बहिणी वगैरे स्त्रियांची विद्या पोक्त व अनुभवी संतिणींकडून व्हावी हें त्यांचें भाग्य मोठें बलवत्तर होय. सेवाश्रमांतील परिव्राजिकांची ही कामगिरी लक्षांत आणून हिंदुस्त्रियांनींही योग्य वेळीं सेवाश्रमी होऊन त्यांचें अनुकरण कां करूं नये ? पण हा प्रश्न विचारूं कोणाला आणि त्याचें उत्तर तरी आज कोण देणार !

जीं कामें पूर्वींच्या स्त्रियांनीं केलीं, जीं कामें आज यूरोपअमेरिकेंतील विद्यासंपन्न स्त्रिया करीत आहेत, तीं हिंदुस्थानांतील स्त्रियांनाही ज्ञान मिळेल तर करतां येतील. मुलींनो हीं व अशींच दुसरीं ह्या सेवाश्रमांतील पुण्यवान स्त्रियांचीं चरित्रें ऐकून त्याप्रमाणें कांहीं भाग तरी स्वतःच्या आचरणांत आणण्याचा तुम्ही प्रयत्न करा. मोठेपणीं अशा आचरणानें तुमच्या हातून परोपकार होईल, इतकेंच नव्हे तर ह्या कष्टमय संसारांत हताश होऊन ‘ मरण येईल तर बरें ’ असा व्यर्थ जप करीत बसण्यापेक्षां हौसेनें आणि हिमतीनें सेवाधर्म आचरीत असतां तुमचें आयुष्य सत्कार्याला पुरत नाहींसे होईल व एके प्रकारच्या दिव्य अशा आनंदांत जाईल. असें एकदां सत्कार्यांत मन रमलें म्हणजे त्याचा विकास व्हावा आणि त्याची आत्मयोगाची तयारी व्हावी हा तुमचा भाग्योदय मग नियमानेंच होणारा आहे.

## १९. स्त्रियांचा योगाश्रम.

योग आणि योगाश्रम हे वाणीचे विषय नाहींत. तरी एकदां मीं योगाश्रमाचें विवेचन करण्याचा प्रयत्न केला, व आतां तोच कठीण प्रसंग पुन्हा आला आहे. पण इतकें बरें कीं तें पूर्वींचेंच विवेचन येथेंही लागू असल्यामुळें स्त्रियांच्या

योगाश्रमाविषयीं आतां कांहीं नवीन शिकवावयाचें नाहीं. **जीव तेथें योग.** योगावस्थेचे विचार सर्व जीवांना सारखेच लागू असावयाचे.

योग हा मनाचा विषय; तो विषय कांहींसा एकांताचा आहे. यामुळें तो वास्तविक पहातां पुरुषांपेक्षां स्त्रियांसच जास्त साधण्यासारखा आहे. पण हें जसें प्रत्येक पुरुषाला लागू नाहीं तसें तें प्रत्येक स्त्रीलाही लागू नाहीं. पहिल्या तीन आश्रमांत निर्दिष्ट केलेले गुण अंगीं आले असतील तर योगाश्रमाचे धर्म अंगावर घेतां येतील. स्त्रियांनीं, विशेषतः उतार वयांतील विवेकी स्त्रियांनीं, योगाश्रमाचे आदर्शविचार नीट मनन करून पहावे व आपल्याला साधेल ती योगमार्गाची दिशा पतकरून सावधपणानें आणि ज्ञानपूर्वक आचरून पहावी. पहिल्यापासून तीन आश्रमांत जर स्त्रियांना ज्ञानाचा लाभ झाला, आणि अध्यात्मांतले भारतादि प्रमाणग्रंथ जर त्यांनीं स्वतः पाहिले, तर भोळ्या स्त्रिया ज्याप्रमाणें कोणालाही चार आणे फी देऊन गुरु करतात व फसल्या जातात, तशा ह्या योगाश्रमदीक्षा घेऊं पहाणाऱ्या अधिकारी स्त्रिया न फसतां मार्गदर्शकाची पारख करूं शकतील व अंतःस्फूर्तीच्या साह्यानें खऱ्याच मार्गाला लागतील.

पण अंतःकरणाच्या प्रतीतीनें गुरुमार्ग सांपडला नाहीं तरी योगावस्थेचे आदर्शविचार पुढें ठेवून घरींदारीं स्वस्थ चित्तानें वागून लोकहिताचें आणि संसारी जनांना शांतिसुख देण्याचें किती तरी काम करतां येईल. नुसतें घरांत बसून जरी भक्ति, उपासना, ग्रंथवाचन, ह्यांत वेळ घालविला तरी त्यापासून घरांतील इतर माणसांच्या आचारविचारावर चांगला परिणाम झाल्यावांचून रहावयाचा नाहीं. अशा अधिकारी स्त्रिया रोज घरीं मुलांना स्तोत्रें किंवा भूपाळ्या शिकवितील, कांहीं वेळ भारतादि ग्रंथ वाचून त्याचीं घरच्या घरीं चर्चा करतील, लहान मुलांमुलींस विद्याबोध देण्यांत वेळ घालवितील, तर ज्या घरांत त्या रहातात त्यांतील संसारांत सुखशांति नांदेल, इतकेंच नव्हे तर शेजाऱ्यांपाजाऱ्यांवर आणि गांवांतील लोकांवर चांगले परिणाम झाल्यावांचून रहावयाचे नाहींत.

विधवा स्त्रियांनीं तर याचा अवश्य विचार करावा. त्यांच्या अवस्थेचा आज मान कमी झाला आहे. विधवेचें दर्शन अज्ञजन अशुभ मानतात; आणि साधुसंन्याशांचें दर्शन शुभ मानतात. पण जर स्त्रिया विद्यासंपन्न होतील, आणि विधवापणीं योगाश्रम पतकरून धर्मवानपणानें येणारी पवित्रता

व गंभीरपणा आपल्या अंगीं आणतील, तर आजचा मनु पालटेल आणि त्यांचें विधवापण संन्यास होईल व तापसी—योगिनी—भूदेवता या अधिकाराला येऊन त्या सर्वांना वंद्य होतील.

वैधव्य हें दुर्दैव तर खरेंच पण अंतरींचीं आत्मा—मन—बुद्धि हीं सदैव सौभाग्यवान असल्यामुळें देहाचें वैधव्य हें अंतरात्म्याचें वैधव्य नव्हे. आत्मा—बुद्धि—मन हीं निरंतरचीं आहेत तशींच आहेत व तीं सर्व अवस्थांतून बोध घेऊन आत्मानुभवानें सौभाग्यशाली होत आहेत. तीं देवाकडून आलीं, तीं देवापाशीं रहातात, आणि तीं देवपणा ओळखण्यास उपाधींत उतरलीं आहेत. आर्यदेशांतील विधवांनो तुम्ही आतां दुसऱ्याचा संसार कां करीत बसतां ? तुमच्यापैकीं पुष्कळांना पोटाची काळजी नसून त्या योगाश्रम न पतकरतां दुसऱ्याच्या संसारांतच रात्रंदिवस निमग्न असतात हें बरें काय ? कांहींना पोटासाठीं काम करावें लागतें. कबूल; पण तितकें केल्यावर मन रामचरणीं न लावतां, किंवा बाकीच्या वेळीं ज्ञानाचा आणि परोपकाराचा विचार न करतां, तुम्ही ज्या संसारविचाराशीं एकजीव होऊन त्याचीच विवंचना करीत बसतां हें तुमच्या पेशाला शोभतें काय ? तुम्ही आतां संन्यासिनी ना ? तुमची वास्तविक योग्यता मोठी असून ती तुम्हीच कमी करून घेतां. तुम्ही मन संसारांत ठेवतां म्हणून दुःखी आहां. तुमच्या हृदयांत भगवान आहे त्याजवळ मन ठेवा, त्याजवळ ज्ञान मागा, सुखदुःख त्याला सांगा. आपल्याच सुखांत निमग्न झालेल्या जगापाशीं सुखाची कसली याचना करतां ! त्यापेक्षां मुख्य आधार भगवंताचा मागून, कामापुरता उद्योग करा पण मन योगावस्थेंत स्थिर राखून ज्ञानाचें आणि परहिताचें चिंतन व आचरण करीत रहा. सर्व मनोवृत्तींपेक्षां मनाची योगवृत्ति श्रेष्ठ आहे, म्हणून कृष्ण म्हणतात—

**तस्मात् योगी भवार्जुन ।**

युद्ध कर, कर्तव्य कर, पण तें करीत असतां मनानें अर्जुना तूं योगी हो !

स्त्रियांचा योगाश्रम हा सगळ्या प्रकारच्या स्त्रियांकरितां आहे. त्यांचे वडील असोत वा नसोत, पति असो वा नसो, अंतरींची तयारी असेल तर त्यांना आधीं विद्यामार्ग तसा आतां योगमार्ग दिसेल आणि योगाश्रमधर्माचा अनुभव घेतां येईल. आईबापांची अडचण, पतीची अडचण, लोकापवादाची अडचण, ह्या सर्व बिचाऱ्या जडावस्थेंतच रहातात. योगाची भूमिका मनाची वा हृदयाची

असतां तेथें वडील काय करतील, तेथें पति कोठून येईल, आणि लोकापवादाचा प्रवेश तरी तेथें कसा होईल सांगा! देह आईबापांच्या घरीं आणि मन सद्गुरूच्या आश्रमांत, देह पतीच्या संसारांत आणि मन सद्गुरूच्या चरणीं, देह लौकिक कामांत मग्न आणि हृदयांत सद्गुरूचें ध्यान, अशी योगावस्था अनुभवून जगाला आशीर्वाद देणाऱ्या स्त्रिया सर्व देशांत झाल्या आहेत—आज आहेत—आणि पुढें होतील. त्यांच्या चरित्रांचें वर्णन मी कसें करूं! नाहीं, मुलांनो आणि मुलींनो मला बोलवत नाहीं! त्या योगिनींना वंदन करून मी हा विषय पुरा करतों!!

## १६. वीरवृत्तीचे असामान्य धर्म.

विद्या शिकून गृहाश्रम करावा व पुढें क्रमाक्रमानें साधल्यास आणखी दोन आश्रम पतकरावे वगैरे सामान्य नियम किंवा सामान्य धर्म हे सामान्य जनांविषयीं झाले. ते जसे अज्ञ जनांत तसे सुज्ञ जनांसही लागू नाहींत. अज्ञ जनांस सामर्थ्य नाहीं म्हणून आश्रमधर्मांची जबाबदारी त्यांवर नाहीं; सुज्ञ जनांस असामान्य सामर्थ्य असतें म्हणून त्यांना आश्रमांचा धोपट मार्ग लागू नाहीं. संसाराचा, म्हणजे स्वार्थपर संकोचधर्माचा, त्यांचा अनुभव मागच्या जन्मीं पुरा झालेला असतो किंवा ते विवेकानें तो पुरा करून स्वार्थाचा आणि संसाराचा मोह दूर सारूं शकतात म्हणून त्यांच्या त्या धीरवान मनोवृत्तीला वीराची वृत्ति समजून त्यांच्या उन्नतीचे जे विशेष प्रकारचे नियम त्यांस 'वीरवृत्तीचे असामान्य धर्म' म्हणण्यास हरकत नाहीं.

वास्तविक ह्या प्रकाराला अपवाद म्हणण्याची गरज नाहीं. अज्ञ, सामान्य, व सुज्ञ ह्या तीन उन्नतीच्या अवस्था आहेत. ज्या अवस्थेंत जो जीव असेल त्याला त्या अवस्थेचे उन्नतिधर्म लागू आहेत. अज्ञ माणसाचें आश्रमधर्मासंबंधानें अनियमित आचरण तसें सुज्ञाचेंही या नियमांनीं न चालणारें. अज्ञानें गुण नसतां पुढें येऊं नये, सुज्ञानें विशेष गुण असतां चतुराश्रमनियमचक्रांत री री करीत मागें राहूं नये. प्रत्येकानें स्वधर्म पुरा करावा त्याचा हा असा अर्थ घ्यावयाचा.

वीरवृत्तीच्या मुली आणि मुलगे, स्त्रिया आणि पुरुष, ह्यांनीं गृहाश्रम पतकरला नाहीं तर त्यांत दोष नाहीं इतकेंच नव्हे, तर अशांनीं ज्ञानाचीं आणि परोपकाराचीं कामें करण्यांत जन्म घालविण्याचें सोडून जर गृहाश्रम पतकरला तर तो दोष किंवा पाप होईल. शाळेंत ज्या वर्गांतला अभ्यास पुरा झाला

आहे त्याच वर्गांत पुन्हा ‘ शिरी शिरी, गग गग ’ करीत जो राहील त्याचें ज्ञान वाढणार नाहीं तशांतलाच हा प्रकार आहे.

कांहींचा अनुभव पुरा झालेला असतो व कांहीं जीवांचा तो पूर्णतेच्या जवळ आलेला असतो. पहिले वीरवृत्तिवान, आणि दुसरे वीरवृत्तीचे उमेदवार म्हणण्यास हरकत नाहीं. दुसऱ्या प्रकारच्या जीवांना संसार विवेकानें ओळखून पुढें जातां येईल. ही गोष्ट प्रयत्नसाध्य आहे व तोच विचार आपल्याला येथें महत्त्वाचा आहे. प्रयत्न करीत असतां कांहींना अखेरपर्यंत यश येणार नाहीं. न येवो. पण प्रयत्न करीत असतां केलेली विद्या वा सेवा वा योगदशा कामीं पडेल आणि जीवभावावर झालेले प्रयत्नाचे संस्कार कोठें तरी व कधीं तरी उपयोगीं पडतील. अपयशाच्या भीतीनें प्रयत्नच करावयाचा नाहीं असें वीरवृत्तीचा माणूस कधींही म्हणणार नाहीं. त्याला तें अंतःकरणाची स्फूर्तीच सांगेल व तो निकराचा प्रयत्न करीलच करील. ‘ मी काय करूं ’ असें तो दुसऱ्याला विचारणार नाहीं. जें काय करणें असेल तें स्वतःचा निर्धार करून करील व सगळी जबाबदारी स्वतःच्या शिरावर घेईल. तो यशाचा जसा एकटा तसा अपयशाचाही एकटाच वांटेकरी. तर ज्या मुलांचा किंवा मुलींचा, ज्या पुरुषांचा किंवा स्त्रियांचा, अनुभव जवळजवळ आलेला असेल त्यांनीं विवाहाश्रम न पतकरतां रहाण्याचा निर्धार केला तर विवेकानें अनुभवाची भर घालून सर्व आयुष्य विद्या सेवा योग यांत यथाशक्ति घालवितां येईल. अशांनीं जगाचें पुष्कळ कल्याण केलें आहे व अशांची ह्या देशाला आज फार गरज आहे.

विद्या, कला, ज्ञान, यांत आमचा देश मागें आहे. जगभर संचार करून आजच्या मनूंत मान्य मानलेलें व्यवहारज्ञान स्वदेशीं आणणारे वीरजन पुष्कळ हवे आहेत. ते लहानपणापासून तयार केले पाहिजेत. यासाठींच तर विवाहाला पूर्वी गुरूची परवानगी लागे. त्याला मुलांची वृत्ति कळून आल्यामुळें तो एखाद्याला नैष्ठिकब्रह्मचर्याचें व्रत देई व हा **वीरशिष्य** देशाचें आणि विद्येचें मोठें काम करी. आजच्या काळांत उपनयनाच्या वेळीं गुरूची जागा बाप घेतो. तर तोच आज मुलाची व मुलीची विद्या पुरी करून त्यांच्या मनोवृत्तीला योग्य वळण लावण्याबद्दल जबाबदार आहे. असें जर आईबाप न करतील, किंवा अंगीं वीरवृत्तीचें सामर्थ्य असून मुलें आणि मुली आपल्या हिमतीवर गृहा-

श्रमाकडे पाठ फिरविणार नाहींत, तर त्या अर्जुनासारखें होईल. तो अर्जुन वीर असून अधर्म करूं पहात होता, तो क्षत्रिय असून स्वधर्म अंगावर घेण्यास भीत होता, तेव्हां कृष्णगुरु त्याला म्हणतात अरे असें करशील तर तुला ' जगचि अभिशाप देईल !' तसें आमचें होईल आणि होत आहे. तर वीर-वृत्तीच्या पुरुषांनो आणि स्त्रियांनो तुम्ही मन निष्ठुर करून मान–धन–मोह यांकडे पाठ फिरवून आपलें वीरवृत्तींचें निशाण हातीं घ्या, वीरवृत्तीचा स्वधर्म अंगावर घ्या, आणि दीन होऊन पडलेल्या हिंदुस्थान देशाचा आशीर्वाद मिळवा. तुमच्या एकनिष्ठ उद्योगाची आणि अनन्यसेवेची या देशाच्या उद्धाराला गरज आहे.

ज्याला मुलगा नाहीं त्याला मोक्ष नाहीं असें एक जुनें शास्त्र आहे. पण तें फार जुनें आहे. ज्या वेळीं आर्यलोक थोडे होते त्या वेळीं शास्त्रकार विवाहाला उत्तेजन देत असत हें बरोबर आहे. रोमन लोकांतही एके काळीं विवाह करील त्याला राजा जमीन बक्षीस देत असे. पण त्याचें आतां काय ? आतां आर्यदेशांत तीस कोटी लोक आहेत, व तसेंच आतां बंध आणि मोक्ष आपला आपल्याच हातीं आहे अशा धर्मसंस्थापनेचा काळ आहे. एके ठिकाणीं मनुशास्त्र ( ५. १५९ ) म्हणतें—

**अनेकानि सहस्राणि कुमारब्रह्मचारिणाम् ।**
**दिवं गतानि विप्राणां अकृत्वा कुलसंततिम् ॥**

कुमारपणांत राहूनही हजारों विद्वानांना स्वर्गगति मिळाली आहे. रामदास, शंकराचार्य, विवेकानंद, हर्बर्ट स्पेन्सर, डार्विन ह्या वीर पुरुषांनीं, आणि नायटिंगेल, कार्पेंटर, मुक्ताबाई ह्या वीरस्त्रियांनीं, किती तरी जगावर उपकार केले आहेत. अशांचा हाच स्वधर्म. गृहाश्रमदीक्षा त्यांची योग्यता कमी करणारी आहे.

प्रत्येक मुलाचा आणि प्रत्येक मुलीचा विवाह झालाच पाहिजे हा विचार साहजिक असला तरी त्याला कांहीं मर्यादा नको काय ? विवाह पाहिजे पण तो लहानपणींच कशाला ? आणि पुढें वयांत आल्यावर वाटल्यास मुलांमुलींना आपले स्वतःचे विवाह करतां येणार नाहींत काय ? ज्यांचे आईबाप नाहींत त्यांचे नाहींत का विवाह होत ? अशा प्रकारचा कांहीं तरी विवेक करून रहाणें बरें. आईबापांनीं मुलांचे गुण ओळखून व देशकाळावर दृष्टि ठेवून त्यांची मनोवृत्ति

वीरवान करण्याचा प्रयत्न करावा, व कांहीं तरी पुरुषार्थाचीं कामें देशासाठीं व धर्मासाठीं करण्याची ईर्षा उत्पन्न करून बाकीचा त्यांच्या संसारविचाराचा भार देवावर टाकावा, हेंच योग्य होय !

आजच्या मनूंत **वीराश्रम** घेण्याचा, वीरवृत्तीचे असामान्य धर्म आचरण्याचा, प्रयत्न करणाऱ्या पुरुषाचें व स्त्रीचें एकेक उदाहरण सांगून हा भाग पुरा करतों. अशीं उदाहरणें दुसरीं नसतील असें नाहीं. पण या वेळीं ज्यांच्या आचरणांत विशेष आदर्शविचार दिसतो अशीं मला सुचतात तींच उदाहरणें देतों. कांहीं जातींत मुलींचीं लग्नें लवकर होत नाहींत, पण त्या कुमारिका निरुपायास्तव तशा रहातात आणि मनानें विवाहाचा जप जपीत असतात. तो वीराश्रम नव्हे. ज्ञानाच्या बळावर त्यांना आपल्या आपदवस्थेचें रूपांतर करतां येईल, पण आज तशी स्थिति नाहीं. तर ज्यांना विवाहाश्रम शक्य होता पण ज्यांनीं मनाचा निर्धार करून तिकडे पाठ फिरविली आहे अशा—अत्यंत लीनपणें आपलें व्रत आचरणाऱ्या—दोन माणसांचीं उदाहरणें सांगतों, म्हणजे आजच्या मनूंतही ह्या असामान्य वीराश्रमाची कशी शक्यता आहे हें तुमच्या ध्यानांत येईल.

**सखाराम गणेश पंडित बी. ए.** ह्यांचे आईबाप सुखवस्तु असून अमदाबादेस रहातात. सखारामपंत हे फर्ग्यूसन कालेजांत बीएपर्यंत विद्या शिकले. तेथें असतांनाच गृहाश्रम न करतां आपलें आयुष्य ज्ञानप्रसारांत व परोपकारांत घालवावयाचें असा त्यांनीं निश्चय केला. पुढें ते बीए होतांच वरादाराचा विचार न करतां निश्चितपणें वीराश्रम पतकरून काशीस जाऊन राहिले. त्यांचे आईबाप सुज्ञ असल्यामुळें त्यांची या कामीं पूर्ण संमति मिळाली व सखारामपंतांस घरचा कांहीं त्रास झाला नाहीं. काशीस राहून त्यांनीं संस्कृत, धर्म, आत्मविद्या, पाश्चिमात्य तत्त्वज्ञान यांचा जास्त अभ्यास केला व हिंदुस्थान ब्रह्मदेश वगैरे ठिकाणीं अनेक जागीं धर्मोपदेशासाठीं संचार केला. आतां ते फ्रांस, इंग्लंड, येथें जात आहेत, व पुढें अमेरिकेंत कांहीं वर्षें राहून तेथें वेदान्त शिकविण्याचा त्यांचा विचार आहे. देशांतील मोठमोठ्या विद्वानांनीं त्यांना संमतिपत्रें दिलीं आहेत त्यांत नामदार **प्रोफेसर गोपाळ कृष्ण गोखले** आपल्या संमतिपत्रांत शेवटीं म्हणतात कीं " दूर देशीं आपला एक असा विद्वान माणूस काम करीत असलेला पाहून हिंदुस्थानांतील लोकांस आनंद व अभिमान

वाटेल. ” अशा प्रकारें लोकसेवा करण्याचे प्रसंग मिळणें हें सखारामपंतांच्या वीरवृत्तीचें फळ होय.

स्त्रीचा वीराश्रम **मथुराबाई जोशी** यांचा. मुलींनो ही त्यांची तसबीर पहा.



त्यांच्या चर्येवरूनच त्यांच्या अंगची नम्रता व धर्मवृत्ति दिसून येते. त्या सातारा येथें आपल्या वडिलांच्या ‘ शांतिभवन ’ नामक आश्रमांत राहून विद्याभ्यास, धर्मकार्य, परोपकार यांत काळ घालवीत आहेत. त्यांचा जन्म १८८४ त झाला असून त्या आज सुमारें बावीस वर्षांच्या आहेत. त्यांचे वडील राव बहादुर मोरो चिंतामण जोशी ह्यांनीं त्यांना उत्तम विद्या दिली आहे इतकेंच नव्हे तर परोपकाराच्या वीरवृत्तीचें चांगलें वळण लावलें आहे. वडील गुरूच्या ठिकाणीं असल्यामुळें त्यांनीं आपल्या शिष्यबालिकेला गुणांप्रमाणें शिक्षा लावून दिली आहे. मथुराबाईंचा विद्याभ्यास थोडा घरींच व बाकीचा इंग्रजी, मराठी, संस्कृत असा नगर धुळें पुणें सातारा येथें निरनिराळ्या शाळांत झाला.

धुळ्यास मुलींची शाळा नव्हती तरी शिक्षण बंद पडूं नये म्हणून वडिलांनीं त्यांना मुलांच्याच हायस्कुलांत ठेवलें होतें. त्या १९०४ सालीं म्याट्रिक्युलेशनच्या परीक्षेला बसल्या होत्या. गृहाश्रम न पतकरतां विद्याभ्यासांत व लोकसेवेंत काळ घालवावा असें प्राचीन ब्रह्मवादिनींचें व्रत वडिलांनीं मथुराबाईंना लावून दिलें व ते विचार आतां त्यांचे स्वतःचेच बनले आहेत. बालपणापासून वीरवृत्तीचें वळण, वडिलांचें प्रोत्साहन, विद्येचें बळ, धर्मकार्यांत व परोपकारांत होणाऱ्या स्वानंदाचा प्रत्यक्ष अनुभव, ह्यांमुळें गृहाश्रम न पतकरतां अविवाहित राहूनच विद्या उद्योग परोपकार यांत काळ घालवावा असें त्यांना वाटणें अगदीं साहजिक आहे. त्यांचा काळ आज वाचन, लेखन, व पुराण वगैरे रूपानें धर्मविवेचन, यांत जात असून साताऱ्यांत स्त्रियांसाठीं स्थापन केलेल्या दोन तीन संस्थांना यांची मदत आहे. पहा एक संसार नाहीं तर माणसाला आपल्या इतर संसारी अनाथ दुःखी व अज्ञानी बंधुभगिनींच्या किती तरी उपयोगीं पडतां येतें. पण याला वीरवृत्ति मूळची लागते किंवा विवेकानें आणि प्रयत्नानें ती कमवावी लागते. ज्याच्या अंगीं ती येईल त्याला वीरवृत्तीचे असामान्य धर्म पाळतां येतील.

असा प्रयत्न करणारे जे स्त्रीपुरुष असतील त्यांच्याकरितां स्वतंत्र **मठ** किंवा **आश्रम** पाहिजेत. कांहीं दिवस तरी यांनीं संसारी माणसांपासून दूर रहाणें अवश्य आहे. धर्मसंस्थापकांनीं अशीच कांहीं तजवीज करून लोक तयार केले. शंकराचार्यांनीं मठ स्थापन करून पुढें धर्मोपदेशक होणाऱ्या बटूंची निराळें राहून विद्या शिकण्याची सोय केली. गौतममुनीनें भिक्षुभिक्षुणींसाठीं विहार स्थापन केले. त्याचें अनुकरण करणाऱ्या क्रूस्ती आचार्यांनाही जोगिजोगिणींसाठीं कॉन्व्हेंट नांवाचे आश्रम बांधावे लागले. तर आजच्या मनूंतही धर्माच्या व देशाच्या कामासाठीं आम्हीं मठ स्थापिले पाहिजेत कीं जेथें अशा माणसांनीं राहून विद्या शिकावी आणि पुढच्या मिशनरीपणाची तयारी करावी. त्यांची व्यवस्था कशी असावी हें सांगण्याचा हा प्रसंग नव्हे. येथें इतकेंच सांगावयाचें, कीं जीव जरी सर्वशक्तिमान आहे तरी बाहेरचें साह्य त्याला मिळालें असतां त्याचा वियोग ते योग असा प्रवास सुलभ होईल, व तसा तो व्हावा म्हणूनच आश्रमधर्म नांवाचे नियम ऋषींनीं सांगितले. ते त्यांचे सूत्ररूप बोल माझ्या विचाराला दिसले तसे मीं निवेदन केले.

## १७. ' पृथिव्यां सर्वमानवाः ।'

आश्रम म्हणजे घर. घरांत नेहमीचीं माणसें रहातात तसा कधीं कधीं पाहुणा येत असतो. तो कधीं येईल व कधीं जाईल याचा नेम नाहीं म्हणून त्याला अ-तिथि म्हणतात. विद्याश्रमादि चार किंवा पांच आश्रमांत देखील कधीं कधीं अथिति येऊन उतरतात, पाहुणे येऊन बिऱ्हाड ठेवीत असतात. ते अतिथि म्हणजे संत, मुक्त, सिद्ध, भक्त, शिष्य, किंवा सांप्रदायिक होत. ते प्रत्यक्ष आचरणानें जगाला बोध करीत असतात व बोध करण्यासाठींच जरूर असेल तें काम अंगावर घेतात व जरूर असेल तो आश्रम स्वीकारतात. ते विद्याश्रमी होतील, ते गृहाश्रम पतकरतील, तसेच इतर आश्रमांचीही दीक्षा घेतील. पण त्यांचें विशेषपण पारदर्शक पदार्थांतून तेज बाहेर यावें तसें बाहेर प्रगट झाल्यावांचून रहात नाहीं. त्यांच्या चरित्राचें वर्णन येथें मी करण्याच्या भरीस पडत नाहीं कारण तें मला साधणार नाहीं. भक्तांचा विद्याश्रम, संतांचा संसार, सिद्धांचा आणि मुक्तांचा सेवाश्रम किंवा योगाश्रम किंवा वीराश्रम ह्यांचें यथासांग वर्णन करण्यास तेच आले पाहिजेत !

तर आपण इतका वेळ विचार करीत आहों तो अमुक्तांविषयीं किंवा वियोग ते योग वाट चालणाऱ्या सामान्य साधकांविषयीं होय. ह्याच चार किंवा पांच आश्रमांत कधीं कधीं मुक्त किंवा व्रतस्थ शिष्य रहात असतात इतकें लक्षांत ठेवूं म्हणजे पुरे.

आतां एकच विचार सांगावयाचा राहिला. सनातनधर्म हा सनातन धर्म; त्याचा दुसरा अर्थ नाहीं. त्याला लोकांवरून किंवा देशावरून नांव द्यावयाचें नाहीं. तो सनातन, नित्य, सर्वत्र व सर्वकाळ अबाधित राहून सर्वांना मार्ग दाखविणारा. त्यांत देवाचा, जीवाचा, व जीवाच्या उद्धाराचा विचार होतो. म्हणजे सनातनधर्मांतील विचार, व त्यांतीलच ' आश्रम आणि आश्रमधर्म ' ह्या भागाचे विचार, केवळ हिंदुनामक स्त्रीपुरुषांविषयीं नसून **पृथ्वीवरील सर्व माणसांकरितां आहेत.** जीव तेथें धर्म. म्हणून, जेथें जीवभाव म्हणून आहे तेथें धर्म हा उपकारक असलाच पाहिजे.

याला एक प्रमाण आहे तें असें. यूरोपअमेरिकेंत जेथें जेथें सनातनधर्माचे सिद्धांत लोकांच्या कानांवर जातात तेथें तेथें विचारी स्त्रीपुरुष ओ देतात. त्यांना ते मान्य होतात यावरून उघड दिसतें कीं ते सर्वांच्या कामाचे आहेत.

जुनी परंपरा पाहिली तरी हेंच अनुमान निघतें. ऋषींचे किंवा संतांचे ग्रंथ धर्माला केवळ धर्म म्हणतात, व त्याचा गुण सनातन असा सांगतात. वेद, उपनिषदें, भारत, रामायण, कथा, पुराण, अभंग, ओवी, अशा अनेक रूपांनीं प्रगट झालेला धर्म सर्वांनीं सर्वांसाठीं मुक्तकंठानें सांगितला व तो सर्व जीवांनीं आजपर्यंत ऐकला. सांप्रत तो प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रूपानें अनेक भाषांतून सर्वांशीं बोलत आहे व पुढेंही हेंच काम तो करीत राहील. त्याचा गुणच तसा आहे बरें ! आणि तो ज्यांनीं शिकविला ते कृष्णदेवासारखे **जगद्गुरु** खरोखरच **जगाचे गुरु** होत.

तर सनातनधर्म, आश्रमधर्म, हे सर्वांनीं शिकावे आणि आचरावे व आम्हीं ते सर्वांना शिकवावे. याविषयीं मनूचें एक वचन मनन करण्यासारखें आहे.–

**एतद्देशप्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः ।**
**स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्वमानवाः ॥**

ह्या देशांत जन्मास आलेल्या ज्ञात्यांपासून आपापल्या आचरणाचे नियम, आपापला स्वधर्म, शिकावा – कोणीं, तर पृथ्वींतील सर्व माणसांनीं (२.२०)! पहा हें काम किती महत्त्वाचें आहे तें. आज यूरोपअमेरिकेंतील लोक आत्मज्ञान शोधीत आहेत, त्यांना तें शिकवा. ते मग आम्हांला आणि आमच्या देशाला गुरुस्थानीं मानतील, व असें होऊं लागलें म्हणजे देव जे आहेत ते स्वतः जन्मास येऊन किंवा अन्य प्रकारें आर्यदेशाला राष्ट्रपदवी प्राप्त करून देतील! मग त्या उज्ज्वल व भाग्यशाली आर्यराष्ट्रांत आत्मविद्या जी आहे ती जीवमान राहून पृथ्वींतील सर्व मानवांचा उद्धार करती होईल !

मुलांनो आणि मुलींनो, आपलें पुराण संपलें; आतां आपण ह्या पहिल्या सप्ताहाची समाप्ति करूं. पुन्हा दुसरे सात विषय घेऊन दुसरा सप्ताह मांडीन तेव्हां तुम्ही सर्व जण अगत्यानें श्रवणाला या बरें, विसरूं नका.

समाप्तीच्या वेळीं लोक प्रसाद वाटतात. आपला प्रसाद बोधाचा. धर्मालयांत बसून विचार करीत असतां तुम्हांला आणि मला जो बोध झाला असेल तोच आपला प्रसाद व तोच आपल्याला देवाचा आशीर्वाद !!

**शुभं भवतु ।**



नवीन मराठी ग्रंथ;- छापत आहे.

# विष्णूचे अवतार.

' **अवतार** ' या विषयावर योगिनी आनी बेझंट बाई यांचीं इंग्रजींत चार व्याख्यानें आहेत. त्यांचें हें मराठी भाषांतर

**रा० रा० गजानन भास्कर वैद्य बी. ए. एफ. टी. एस.**

यांनीं केलेलें आम्ही छापीत आहों. त्यांत खालीं दिल्याप्रमाणें विषय आला आहे.

**व्याख्यान पहिलें.** — (१) संत आणि याज्ञिक. (२) अवतार आणि आवेश. (३) अवतारमीमांसा. (४) पूर्णावतार. (५) अवताराचें कार्य. (६) अवताराचे गुण. (७) स्फूर्ति.

**व्याख्यान दुसरें.** — (१) अवतार कोण घेतो. (२) त्रिमूर्ति आणि त्रिपुटि. (३) शंकराचार्य-चंडाल-कथा. (४) ब्रह्माण्डमीमांसा. (५) अवतार विष्णु घेतो. (६) देव, महादेव, उपदेव; विष्णु, महाविष्णु, उपविष्णु. (७) अवतार कां घ्यावा लागतो. (८) रज, तम, आणि सत्त्व. (९) पृथ्वीचा धांवा. (१०) सत् व असत् यांच्या अवतारांची जोडी. (११) तस्मात् युध्यस्व भारत.

**व्याख्यान तिसरें.** — (१) दश अवतार. (२) पुराणकथा सत्य व ऐतिहासिक आहेत. (३) मत्स्यावतार, मत्स्यकल्प, सायन्सचें मत्स्ययुग. (४) कूर्मावतार. (५) वराह-कल्प. (६) नृ-सिंह. (७) वामन. (८) परशुराम. (९) राम. (१०) बुद्ध आणि शंकराचार्य. (११) कल्कि. (१२) भावी मानववंशाचे शास्ते मोरु आणि देवापि.

**व्याख्यान चौथें.** — (१) देव आणि ऋषि गोपगोपी झाले. (२) मुरलीचा नित्य नाद. (३) रासलीलेचें गूढ नृत्य. (४) भक्तांचा कृष्ण. (५) शत्रूंचा कृष्ण. (६) मुत्सद्दी कृष्ण. (७) पांडवकैवारी कृष्ण. (८) परमात्मा कृष्ण. (९) जगद्गुरु कृष्ण. (१०) भारती युद्धाचा हेतु.

या ग्रंथाचीं ह्याच सांच्याचीं सव्वाशेंपासून दीडशें पानें होतील. ज्यांना ग्रंथ पाहिजे असेल त्यांनीं नांवपत्ता पाठवावा. ग्रंथ तयार होतांच सूचना पाठवूं.

प्रकाशक — **वैद्य ब्रदर्स.**

काळबादेवी रोड.

**मुंबई.**

जून १९०६.

